






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका

# भाषा आणि जीवन

मराठी अभ्यास परिषद पत्रिका
वर्ष २७ ■ अंक २ ■ उन्हाळा २००९

पेटला सारा उन्हाळा राख झाली
ना कुठे पाणी भुई भेगाळलेली
गाव निजलेला मुका, सुनसान रानी
मी मृगाच्या धुंडतो वाटा सभोती



अनुक्रमणिका

**संपादक :** प्र० ना० परांजपे

**संपादन-सल्लागार :** अशोक रा० केळकर, कृष्ण श्री० अर्जुनवाडकर, आशा मुंडले, द० भि० कुलकर्णी, मॅक्सीन बर्नसन

**संपादन-समिती :** प्र० ना० परांजपे (प्रमुख), नीलिमा गुंडी, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनंद काटीकर

**लेखन व परीक्षणार्थ पुस्तके पाठविण्याचा पत्ता :** प्र० ना० परांजपे, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007.
दूरभाष : (020) 2569 4617 भ्रमणभाष : 94225 09638

**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :**
आनंद काटीकर, द्वारा, मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004. भ्रमणभाष : 94216 10704

**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411 051. दूरभाष : 2434 8756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या **www.marathiabhyasparishad.com** या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट** - 93731 04903 **विजय पाध्ये** - 98220 31963.

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी **पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर** असे आहे. वार्षिक वर्गणी- **संस्थेला** रु० १२५/-, पंचवार्षिक वर्गणी रु० ५५०/-. **व्यक्तीला** रु० १००/-; पंचवार्षिक वर्गणी रु० ४५०/- **परदेशात** अंक पाठविण्यासाठी टपालखर्च रु० १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु० १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु० १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिकेचा'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. (पाठवल्यास आपला पत्ता पिनकोड क्रमांकासह न विसरता लिहावा.)** धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'अॅट पार' नसल्यास रकमेत रु० ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीसाठी नवे दर :** पूर्ण पान रु० २,५००/-, अर्धे पान रु० १,५००/-, पाव पान रु० ८००/-, शुभेच्छा रु० ४००/-, आवरण पृष्ठ तीन रु० ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

प्रकाशन : त्रैमासिक : जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी)

सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य रु० २५/-**

## अनुक्रमणिका


मुखपृष्ठावरील कविता : ना० धों० महानोर, 'पानझड'. मुखपृष्ठ : सुप्रिया खारकर

---

# नवीन कार्यकारी मंडळ आणि पदाधिकारी

१ एप्रिल २००९ पासून पाच वर्षांसाठी अस्तित्वात आलेले मराठी अभ्यास परिषदेचे नवीन कार्यकारी मंडळ आणि पदाधिकारी पुढीलप्रमाणे :

**प्र० ना० परांजपे** (अध्यक्ष), **मृणालिनी शहा** (उपाध्यक्ष),
**आनंद काटीकर** (कार्यवाह), **विजय पाध्ये** (सहकार्यवाह)
**विजया चौधरी** (कोषाध्यक्ष), **नीलिमा गुंडी** (सदस्य), **रंजना फडके** (सदस्य)
**मॅक्सीन वर्नसन** (सदस्य पुण्याबाहेरील), **प्रभाकर ज० जोशी** (सदस्य पुण्याबाहेरील)
**प्रमोद तलगेरी** सदस्य (स्वीकृत), **मनोहर जाधव** सदस्य (स्वीकृत)

**डॉ. स्नेहल तावरे** यांनी निवडणूक-अधिकारी म्हणून काम पाहिले.

**परिषदेच्या नवीन कार्यालयाचा पत्ता :**

द्वारा डॉ० मृणालिनी शहा, 1 शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004.
कार्यवाहांचा भ्रमणभाष : 94216 10704.

## आवाहन

१९८३ पासून, आपल्या संस्थेच्या वतीने 'भाषा आणि जीवन' हे भाषाविषयक त्रैमासिक चालवले जाते आणि सर्व आजीव सभासदांना वेगळी वर्गणी न घेता पाठवले जाते. भाषिक सजगता वाढवण्याच्या संस्थेच्या प्रयत्नांना दिलेल्या या अमूल्य सहकार्याबद्दल संस्था आजीव सभासदांची ऋणी आहे.

गेल्या काही वर्षांपासून अंकाची पृष्ठसंख्या वाढलेली आहे हे आपल्या लक्षात आले असेलच. या वाढत्या पृष्ठसंख्येमुळे कागदाचे वाढलेले दर, वाढता मुद्रणखर्च यांचा ताण संस्थेच्या आर्थिक व्यवस्थापनावर पडतो आहे. भरीस भर म्हणून पृष्ठसंख्या किंवा / आणि अंकाची किंमत वाढवली की टपालखर्चातही वाढ होते. या गोष्टींचा विचार करून सर्व जुन्या आजीव सभासदांनी एकूण रु० १,०००/- एवढी आजीव सभासद वर्गणी भरली तर हा आर्थिक बोजा हलका होऊ शकेल. काही आजीव सभासदांनी यापूर्वी रु० ६०० एवढी आजीव सभासद वर्गणी भरलेली आहे; तरी कृपया उर्वरित रु० ४००/- ही आजीव सभासद वर्गणी भरावी असे आवाहन यानिमित्ताने करत आहोत. आपण या आवाहनाला सकारात्मक प्रतिसाद द्याल अशी आशा आहे.

आपले,

**आनंद काटीकर** (कार्यवाह) **प्र० ना० परांजपे** (अध्यक्ष)







अनुक्रमणिका

# शब्दसंपत्तीचा वारसा

न० र० फाटक यांनी लिहिलेल्या लोकमान्य टिळकांचे चरित्र वाचताना त्यातील एक आठवण माझ्या मनात नोंदवली गेली. त्या चरित्रात टिळकांचे पहिले चरित्रकार कृ० आ० गुरुजी यांनी दिलेली टिळकांच्या बालपणाची माहिती समाविष्ट आहे. त्यात सांगितले आहे की, चौदाव्या-पंधराव्या वर्षी टिळकांची सुंदर नक्षी काढलेली वही त्यांच्या वडिलांच्या हाती पडली. त्यात संस्कृत मजकुराचे इंग्रजी भाषांतर लिहिले होते; 'द्व्यक्षर' या सदराखाली ग,र, तसेच न,म आणि स,र या दोन अक्षरांचा अर्थपूर्ण वापर करून तयार केलेल्या रचना उतरवलेल्या होत्या. शिवाय नयन, नर्तन, कनक, कटक, कालिका, कारिका इत्यादी सुमारे १०० शब्दांची नोंद होती. चरित्रकारांनी टिळकांच्या अल्पवयातील या शब्दसंग्रहाच्या बौद्धिक कसरतीला त्यांच्या भावी व्यासंगसंशोधनाची पूर्वतयारी म्हणून महत्त्व दिले आहे.

आजच्या मुलांना शब्दसंपत्तीचा सामाजिक वारसा किती प्रमाणात मिळतो? मुलांना असा वारसा मिळणार तो घरातून व घराबाहेरच्या परिसरातून! घरात तऱ्हतऱ्हेचे कोश मुलांच्या हाती पडण्याची शक्यता कमीच. त्यामुळे 'शाळा'च या संदर्भात महत्त्वाची भूमिका बजावू शकते. शब्दांची गोडी बालवयातच लागावी लागते. शब्दसंग्रह करण्याची वृत्ती मनात रुजावी लागते. समानार्थी शब्द, विरुद्धार्थी शब्द यांसारख्या पाठ्यपुस्तकातील स्वाध्यायांमार्फत मुलांना शब्दांच्या अफाट विश्वाचे हळूहळू दर्शन घडत असते. त्यामुळे पाठ्यपुस्तकाला विशेष महत्त्व येते.

येथे नव्याने निघालेले इयत्ता तिसरीचे पाठ्यपुस्तक - 'बालभारती' - या दृष्टीने पारखावेसे वाटते. त्यात ग्रामीण भाषेतील शब्दांना प्रमाण भाषेतील शब्द शोधायला सांगून ग्रामीण व शहरी भाषांतील शब्दांचे आदानप्रदान करायचा चांगला प्रयत्न आहे. तसेच 'एका शब्दात लपलेला दुसरा शब्द शोधा' असे मुलांच्या कुतूहलाला दिशा देणारे स्वाध्यायही आहेत; ही जमेची बाजू आहे. मात्र यातील समानार्थी शब्दांविषयीचे स्वाध्याय समाधानकारक वाटत नाहीत. (खरे तर प्रत्येकच पाठाखाली समानार्थी शब्दांविषयीचा स्वाध्याय हवा.)

पाठ्यपुस्तकाकडून अशी अपेक्षा करावीशी वाटते; कारण आपली शिक्षणपद्धती ‘पाठैकलक्ष्यी’ झाली आहे. खरेतर पाठ्यपुस्तक हे शिक्षणाचे एक साधन असते. आपल्याकडे मात्र ते जवळजवळ एकमेव साधन ठरते! पाठाखाली नसलेल्या स्वाध्यायांवर आधारित प्रश्न आला तर तो अभ्यासक्रमाबाहेरचा गणला जातो! अशी आपली परीक्षाही ‘पाठैकलक्ष्यी’ झाली आहे. त्यामुळे पाठ्यपुस्तकाखालील स्वाध्याय अधिकाधिक सर्वसमावेशक असे लिहिण्याची जबाबदारी संपादकांवर येते.

इयत्ता तिसरीच्या मराठीच्या पाठ्यपुस्तकात समानार्थी शब्दांविषयीचे जे काही स्वाध्याय आहेत, त्यात एक किंवा दोनच समानार्थी शब्द देणे अपेक्षित आहे. वास्तविक एकेका शब्दाला चार-पाच किंवा त्याहूनही जास्त समानार्थी शब्द असू शकतात. ही कसर भरून काढण्यासाठी की काय, पाठ्यपुस्तकात ‘आनंद’ ही कविता (कवीचे नाव नमूद केलेले नाही.) (पाहा : पृ० ८०) समाविष्ट आहे. यात यांत्रिकपणे आणि अर्थशून्यतेने यादी म्हणून आलेले समानार्थी शब्द आहेत. पाहा :

‘‘देह, तनू, अन् शरीर, काया । राष्ट्र, मायभू, देशा देऊ ।’’

आता यात ‘तनू अन् शरीर’ या वेगळ्या गोष्टी आहेत का? कवितेत ही समानार्थी शब्दांची यादी निर्जीव ठरत नाही का? संपूर्ण कविता ध्वज, विहंग, रवी, वृक्ष, प्रेम, श्रम, दिवे, गरीब या समानार्थी शब्दांचा ढीग देण्यात खर्च पडली आहे. यामुळे ‘कविता’ या वाङ्मयप्रकाराचे हसे होत आहे! समानार्थी शब्दांमध्ये अर्थदृष्ट्या सूक्ष्म फरक असतो, त्यांची उपयोजनाची क्षेत्रे वेगवेगळी असू शकतात; याची जाणीव करून देणारी टीप वा कल्पक स्वाध्यायही यात आढळत नाही. या पाठ्यपुस्तकात अनेकार्थी शब्दांविषयीचा एकही स्वाध्याय नाही. खरे तर अनेकार्थी शब्द मुलांना नेहमी चकवतात. त्यांची ओळख या वयातच करून द्यायला हवी. पुस्तकात भाषेची सर्वसामान्य उद्दिष्टे सांगताना ‘दैनंदिन भाषिक व्यवहारासाठी आवश्यक ती कौशल्ये विकसित होणे’ हे उद्दिष्ट मानले आहे. लहर, जीवन, माया, आसन इत्यादी पाठ्यपुस्तकातीलच शब्द या स्वाध्यायासाठी निवडता आले असते. शब्दांचे अनेक अर्थ हे भाषिक संपन्नतेचे लक्षण असते. मात्र वापराच्या अभावी तसेच माहितीच्या अभावी या संपत्तीला ओहोटी लागू शकते. उदाहरणार्थ, ‘माया’ या शब्दाचा ‘वस्त्र इ० शिवताना दोरा निसटू नये म्हणून शिवणीच्या बाहेर सोडलेला वस्त्रादिकाचा भाग’ असा अर्थ ‘महाराष्ट्र शब्दकोश’मध्ये (खंड ६, १९३८, पृ० २४७०) दिला आहे. मात्र नुकत्याच निघालेल्या ‘राजहंस मराठी शब्दकोशा’त (२००७) या अर्थाचा समावेश नाही! प्रत्यक्षात हा शब्द पुण्यासारख्या महानगरातही शिंप्याच्या दुकानात ऐकायला मिळतो! अशी शब्दसंपत्ती तिच्या मौल्यवान अर्थांसकट पुढील पिढीच्या हाती सोपवायला हवी.

कविवर्य मर्ढेकरांनी शब्दांना 'परमाणू' म्हटले आहे. जवळ विपुल शब्दसंपत्ती असेल तरच अर्थाच्या सूक्ष्म छटा व्यक्त करणे शक्य होणार! त्यासाठी मुलांना लहानपणीच लहानमोठ्या आकाराचे विविध शब्दकोश सचित्र रूपात उपलब्ध करून द्यायला हवेत. सुप्रसिद्ध लेखक मारुती चितमपल्ली यांनी 'चकवाचांदण' या आत्मचरित्रात आपल्या अम्मानं रंगाविषयीच्या दिलेल्या ज्ञानाचा आपल्याला फुलांच्या आणि पाखरांच्या रंगांचं हुबेहूब वर्णन करायला उपयोग झाला, असे नमूद केले आहे. ''डाळिंबी, मनुका, कथ्या, जास्वंदी, लाल, शेंदरी, गुलाली, मेंदी, गव्हाळी, जांभा, पोवळा, शरबती या तांबड्या रंगाच्या छटा. जिलेबी, लिंबू, सायी, चांदणी, सोनेरी, केशरी, केतकी या पिवळ्या रंगाच्या छटा'' (पृ० ५४-५५) अशा कितीतरी छटांचे वर्णन त्यांनी केले आहे. त्यांच्या आईने त्यांना रंगज्ञान देताना विपुल शब्द दिले, ज्याद्वारे त्यांना रंगसंवेदनेची सूक्ष्मता टिपणे शक्य झाले !

आज मुलांना असा शब्दसंपत्तीचा वारसा उपलब्ध करून देण्यासाठी घरी किंवा दारी कोणीतरी पुढे येणार का ? ■

**नीलिमा गुंडी**

ई-मेल : neelima.gundi@gmail.com

**पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन**

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्यासंबंधी वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम, कलम डी १९(बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४, यांना अनुसरून केलेले निवेदन.

(१) **प्रकाशन स्थळ :** पुणे, महाराष्ट्र

(२) **प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक :** जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).

(३) **प्रकाशक व मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** आनंद काटीकर, भारतीय, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद. द्वारा, डॉ० मृणालिनी शहा, 1 शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004.

(४) **मुद्रणस्थळ :** भंडारी मुद्रणालय, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 051.

(६) **संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** प्र० ना० परांजपे, भारतीय, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007.

मी, आनंद काटीकर, असे प्रतिज्ञापूर्वक सांगतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**आनंद काटीकर** कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद (प्रकाशक)



अनुक्रमणिका

**आदरांजली**

# डॉ० चं० द० इंदापूरकर

मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सभासद डॉ० चं० द० इंदापूरकर यांचे नुकतेच निधन झाले. त्यांचे वय ८१ होते. १९५५ ते १९८० अशी पंचवीस वर्षे त्यांनी चंद्रपूरला जनता प्रशिक्षण महाविद्यालयात उपप्राचार्य म्हणून काम केले. त्यानंतर त्यांनी पुण्यातील टिळक शिक्षण महाविद्यालयात संशोधन विभागाची धुरा सांभाळली. त्यांच्या मराठी व्याकरणावरील पुस्तकाला महाराष्ट्र राज्य पुरस्कार मिळाला होता. आणि 'मराठी भाषा : व्यवस्था आणि अध्यापन' (कॉंटिनेण्टल प्रकाशन, पुणे) या त्यांच्या ग्रंथाला १९८९ या वर्षीचा मराठी अभ्यास परिषदेचा 'महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार' मिळाला होता.

शैक्षणिक दौऱ्यासाठी दोनदा थायलंडला जाण्याची संधी त्यांना मिळाली आणि अनेक भारतीय व थाई विद्यार्थ्यांना त्यांनी संशोधनात मार्गदर्शन केले. निवृत्तीनंतर त्यांनी आपला ग्रंथसंग्रह टिळक शिक्षण महाविद्यालयाला दिला. ■

## परीक्षणासाठी आलेली पुस्तके

- **'मंतरलेले पाणी'** - अरविंद हसमनीस. पद्मगंधा प्रकाशन, पुणे. पृष्ठे : १११. किंमत रु० ९०/-
- **'रेसकोर्स आणि इतर कविता'** - सलील वाघ. टाइम अँड स्पेस कम्युनिकेशन्स, पुणे. पृष्ठे : ६९. किंमत रु० १००/-
- **'सहवास'** - यशवंतराव गडाख. ऋतुरंग प्रकाशन, मुंबई. पृष्ठे : १७५. किंमत रु० १६०/-
- **'चेन्नई मेल'** - वि० चिं० फडके. अरविंद प्रकाशन, ठाणे. पृष्ठे : १४४. किंमत रु० १५०/-
- **'मी माझ्या आत' (कवितासंग्रह)** - पवन करण. अनु० बलवंत जेऊरकर. शब्द प्रकाशन, मुंबई. पृष्ठे : ९९. किंमत रु० १००/-
- **'मराठा ओबीसीकरण'** - संपा० अशोक बुद्धीवंत. श्रमिक प्रतिष्ठान, कोल्हापूर. पृष्ठे : ३१२. किंमत रु० १००/-

# बंगला

ब्रह्मानंद देशपांडे

स्वर्गीय कुंदनलाल सहगल यांच्या स्वर्णिम आवाजातील 'एक बंगला बने न्यारा' हे गीत अमर आहे. लहानपणापासून 'बंगला' या शब्दाविषयी मनात कुतूहल आहे. हा शब्द कसा आला असावा? जवळजवळ सर्वच शब्दकोश असे नोंदवितात की इंग्रज लोक भारतात आले, त्यांच्या पहिल्यावहिल्या वसती बंगाल प्रांतात झाल्या म्हणून त्यांच्या घरांना बंगला हे नाव पडले. (त्यांच्या राजापूर वा मुंबई येथील घरांना मराठा नाव कां बरे नाही पडले?) ही नोंद जवळजवळ सर्वमान्य झाली आहे. पण याला छेद देणारे तीन पुरावे नोंदवतो.

अ. भक्त शिरोमणी मीराबाईने आपल्या एका पदात 'बंगला' हा शब्द वापरला आहे. त्या पदाचा प्रारंभ असा :

करना फकिरी तो क्या दिलगिरी सदा मगन मन रहना रे ॥<br>
कोई दिन बाडी तो कोई दिन बंगला कोई दिन जंगल रहना रे ॥

(मीरा बृहत्पदसंग्रह, संपा० पद्मावती शबनम, लोकसेवा प्रकाशन, बुढानाला, बनारस, संवत २००९, पृ० ३१४, पदसंख्या ५७०)

आ. महात्मा कबीरांच्या पदातही हा शब्द आढळतो.

रामनाम तू भज ले प्यारे काहे को मगरूरी करता है<br>
कच्ची माटी का बंगला तेरा पावपलक मे गिरता है ॥धृ॥

(लोकसत्ता, रविवार, ४ नोव्हेंबर २००७ मध्ये डॉ० सुभाष रामचंद्र सोनंदकर यांनी पाठवलेले पद)

इ. हुमनाबाद (जिल्हा बीदर, कर्नाटक) येथील संत माणिकप्रभू यांचे पद

बंगल्याखालून येतो जातो । किती अकडबाज नाजुक मुखडा ॥धृ॥

(संस्थान माणिकप्रभू, पद्यमाला, प्रकाशक ज्ञानराज, आवृत्ती चौथी, शके १९०७)

अर्थात बंगला हा शब्द इंग्रज भारतात येण्याच्या पूर्वीचा आहे. आमच्या मते त्यांची व्युत्पत्ती वंक अथवा बंक - ग या शब्दापासून असावी. वंक, बँक, बंक, बग

हे यक्ष या देवतेचे पर्यायवाची म्हणून पाइसद्दमहण्णवो, अभिधान चिंतामणि आदि कोश देतात. शिव हा यक्ष, राक्षस, भूत, प्रेत, प्रमथ आदींचा स्वामी असल्यामुळे त्याला वंकनाथ म्हटले जाते. (पिशाचरक्षः पशुभूतयक्ष वेतालराजं त्वथ शूलपाणिम्.) शिवाच्या वंकनाथ या नावाचा उल्लेख विज्ञानेश्वराचे आपेगाव (तालुका अंबड, जिल्हा जालना) येथील शिलालेखात येतो. (शं० गो० तुळपुळे, प्राचीन मराठी कोरीव लेख, पृ० ३७६-३७८) तर शिवाचे बंकेश्वर हे नाव कंधार (तालुका कंधार, जिल्हा नांदेड) येथील राष्ट्रकूट नृपती कृष्णराज (तृतीय) याच्या शिलालेखात येते. (Epigraphia Indica, xxxv, pp.110ff) लीळाचरित्र आणि स्थानपोथीतही वंकनाथ आहे.

प्राचीन काळी नगरद्वारावर यक्षमूर्ती असत. अजिंठा लेणी समूहातील लेणे क्र० १९च्या प्रवेशद्वारावर त्या आहेत. अशा दरवाजांना यक्षद्वार म्हणत. कंधार शिलालेखात 'सिद्धिविनायक मंडित-यक्षद्वारे') असा उल्लेख आला आहे. यक्षाला वक, बंक म्हणत असल्यामुळे अशा दरवाजांना वंकद्वार म्हणू लागले. बंकद्वार हा शब्द लीळाचरित्रात येतो. हरपाळ देवाने रामयात्रेसाठी प्रस्थान ठेवले तेव्हा माता माल्हणदेवी 'तीनि बांकद्वारेवरि बोलवीत आली' (लीळाचरित्र, संपा० वि० भि० कोलते, तिसरी आवृत्ती, पूर्वार्ध लीळा क्र० २०). नरींद्रानेही 'रुक्मिणीस्वयंवर' या काव्यात हा शब्द उपयोजिला आहे. तो असा : निगता वंकद्वाराबाहेरी : येती भेटली मंगळार्ति करी
मग सकुणफळे होणे दिधले सुंदरी : मग वारु नमस्कारिला ॥
(ओवी क्र० ६९२)

टीपकाराने या शब्दाचा अर्थ देवडी असा दिला आहे. श्री० मधु मंगेश कर्णिक यांच्या कोकणातील वाड्याच्या दर्शनी दरवाजाला वाघ दरवाजा म्हणत. येथे वाघ येऊन ओरडून जात असे हे कृत्रिम स्पष्टीकरण. (दैनिक सकाळ, दिवाळी अंक २००२) रायगडला वाघ दरवाजा आहे. वंकद्वार > बंगद्वार > बंगदा > बंगला हा सरळ अपभ्रंशक्रम. देवडी (हिंदी ड्यौढी) हा शब्द जसा दरवाजासाठी आणि महालासाठी वापरतात तसा बंगला हा शब्द संपूर्ण घरासाठी वापरण्यात आला. रघुनाथपंडिताने देवडीवरच्या पहारेकऱ्यासाठी बंकी, दौलतबंकी हे शब्द दिले आहेत (राज्यव्यवहार कोश, संपा० रा० गो० काटे, पृ० १८). मध्यप्रदेशचे गोंड आपल्या घराच्या दर्शनी भागास बंगला म्हणतात (गढा मंडला के गोंड राजा, लेखक रामभरोस अग्रवाल प्रकाशक गोंडी पब्लिक ट्रस्ट मंडला, संवत २०४२, पृ० १६४). तेव्हा बंगला इंग्रजांचा नव्हे.

■

'ऐतिहासिक', 14, अनुपम वसाहत, श्रेयनगर, औरंगाबाद 431 005.
दूरभाष (0240) 233 6606 भ्रमणभाष 98900 00614

# मराठी भाषाविज्ञान संशोधन पद्धती

रमेश वा० धोंगडे

१

मराठी भाषाविज्ञान संशोधन पद्धतीचा विचार करताना प्रथमतः काही अपसमज दूर होणे गरजेचे आहे.

मराठीचे भाषाविज्ञान असे काही वेगळे असणे - 'विज्ञान' या शब्दांचा अर्थ लक्षात घेतला तर - शक्य नाही. मराठी रसायनशास्त्र, मराठी भौतिकविज्ञान वगैरे संभवत नाही. तुमची भाषा वेगळी, आमची भाषा वेगळी असे म्हणता येते. पण तुमचे भाषाविज्ञान वेगळे आमचे वेगळे असे म्हणणे गैर आहे. मराठी सामाजिक भाषाविज्ञान म्हणजे तळागाळातील लोकांच्याच भाषेचा विचार असाही एक अपसमज या अंगाने येतो. कोणाच्याही शरीराबाबत खरे असते ते शरीरविज्ञान. त्याप्रमाणेच कोणत्याही भाषेबाबत खरे असते ते भाषाविज्ञान व कोणत्याही समाजाच्या भाषाव्यवहाराबाबत जे खरे असण्याची शक्यता असते ते सामाजिक भाषाविज्ञान होय.

भाषाविज्ञानातील काही संकल्पना मराठी भाषेतील उदाहरणे देऊन स्पष्ट करणे म्हणजे मराठी भाषाविज्ञान हा दुसरा एक अपसमज. वस्तुतः ते केवळ भाषाविज्ञान असते. चांगले भाषावैज्ञानिक म्हणूनच आपल्या संकल्पना मांडताना विविध भाषांतील उदाहरणे देतात. ही उदाहरणे केवळ पांडित्यप्रदर्शनासाठी नसतात - नसावीत. त्या त्या संकल्पनांसाठी ती आवश्यक असतात. एकाच भाषेत सर्वकाही आढळत नसल्याने असे करावे लागते. उदाहरणार्थ, शब्दसुरांचे वेगवेगळे प्रकार सांगताना मराठीची उदाहरणे देताच येणार नाहीत, कारण मराठी शब्दसुरप्रवण भाषा नाही. उलट रूपिमांच्या रूपिकांवर होणारे विविध संस्कार दाखवायचे असतील तर इंग्रजीपेक्षा मराठी कितीतरी अधिक सोयीची आहे. पण शेवटी विचार हा सर्वसामान्य रूपिमव्यवस्थेचा असतो.

भाषाविज्ञानातील संशोधनपद्धती म्हणजे व्याकरण लेखनातील काही प्रयुक्त्या असा एक तिसरा अपसमज आहे. शब्दाला रूपिम म्हणायचे, वर्णाला स्वनिम म्हणायचे, वाक्य - बदलाला रूपांतरण म्हणायचे की झाले भाषाविज्ञान असे काहींना वाटते.

व्याकरण कसेकसे मांडत जायचे हे सांगणे म्हणजे नवीन संशोधन पद्धती देणे हा समज चुकीचा आहे. 'बनारसमधल्या मराठी माणसांची मराठी मला तपासायची आहे तर मी कसंकसं आणि कायकाय करू ते सांगा' या विनंतीमागे हीच प्रवृत्ती आहे. मुख्य म्हणजे आखून दिलेल्या मार्गाने जाण्यात विचार दुय्यम होतो व विज्ञान हे 'माहिती' होते, याचा विसर पडू देता कामा नये. एखाद्या पाठ्याचे संपादन करण्याच्या प्रयत्नामागे पाठ्य-निर्मिती आणि पाठ्याची अनेकार्थता याबाबत जसे अज्ञान असते तसेच संशोधनाची राजमान्य पद्धती शोधण्यामागे विज्ञानाबाबतचे अज्ञान असते.

कलांच्या प्रदेशात विशिष्ट मार्गाची आवश्यकता असते. किराणा घराण्याची गायकी आणि जयपूर घराण्याची गायकी यात स्वरात फरक नसतो. स्वरांच्या गुंफणीत फरक असतो, विस्तारात फरक असतो. लय आणि ताल दोन्हीकडे स्वराप्रमाणेच आवश्यक पण त्यांची गुंफण करण्याची पद्धती वेगळी, विशिष्ट असते. संगीतशास्त्रात अशा विविध पद्धतींचे संकलन होते. नाट्यशास्त्रात सादरीकरणाच्या विविध पद्धतींचा अंतर्भाव होतो - व्हावा. भाषेच्या विश्लेषणाच्या पद्धतींचाच केवळ अंतर्भाव केला तर 'भाषाशास्त्र' असा शब्द वापरता येईल. या सर्व शास्त्रांमध्ये परंपरा, परंपरेला जुळवून घेणारी नवता, व्यक्तिसापेक्ष आवडी-निवडी यासारख्या गोष्टींना प्राधान्य मिळते. विज्ञान हे या अर्थाने केवळ 'शास्त्र' नव्हे. विज्ञानात सिद्धान्तन असते, केवळ पद्धती नसते. 'विज्ञाना'ला व्यावहारिक संबद्धतेची गरज नसते. 'विज्ञान' ही केवळ एक 'रीती' नसते. घालून दिलेल्या मार्गाने जाणारे विज्ञानाचे पाईक असतात, वैज्ञानिक नसतात. भाषा ही केवळ विविध विश्लेषण पद्धतींसाठीची सामग्री नव्हे. - 'भाषाशास्त्र' या शब्दात तेवढेच अपेक्षित असते. पण भाषेविषयीचे सिद्धान्तन म्हणजे भाषाविज्ञान. आपण या फरकांच्या यामागील वैचारिक चिकित्सेचा गंभीरपणे विचार करायला हवा.

२

'भाषाविज्ञाना'ची आणि 'भाषाशास्त्रा'ची आजची अवस्था काय आहे हा या विचारातील महत्त्वाचा टप्पा आहे.

भाषाशास्त्रातूनच पुढे भाषाविज्ञानाचा उगम झाला. सुरुवातीला आपल्या भाषेचे उगमस्थान कोणते, किंबहुना आजच्या मानवी भाषा या कोणत्या मूळ भाषेतून आल्या या नैसर्गिक कुतूहलापोटी भाषांचा अभ्यास झाला. ग्रीक-लॅटिन-संस्कृत या प्राचीन भाषांच्या शब्दसंपत्तीमधील काही साधर्म्यांवरून त्यांच्या उगमस्थानाचे आडाखे बांधण्यात आले. भाषांना जननी असते आणि कालांतराने मानवी पिढ्यांप्रमाणे भाषांना परंपरा

असते असे मानण्यात आले. काळाच्या ओघात आढळणारे बदल हे ध्वनींचे असतात असे दिसून आल्याने ध्वनिपरिवर्तनाचे काही आडाखे बांधण्यात आले. भाषा-भाषांतील सारखेपणा व वेगळेपणा यातून भाषाकुलाची कल्पना सुचली. उदाहरणार्थ, भारतीयुरोपी - भारतीआर्य - संस्कृत - प्राकृत - महाराष्ट्री - मराठी असा कालानुक्रमी प्रवास ठरविण्यात आला. द्राविडी भाषा आणि चिनी भाषा यांची कुले वेगळी मानण्यात आली. या सर्व गोष्टींना 'ऐतिहासिक भाषाशास्त्र' असे संबोधण्याची प्रथा आहे. ध्वनी आणि शब्द यांच्यापुढे जाऊन वाक्यरचनांचा कालक्रम, त्यामध्ये घडणारे कालानुसारी बदल यांचा विचार आताशी अभ्यासक करू लागले आहेत. मराठीचा या संदर्भात विचार होणे शक्य आहे.

भाषाकुल हे वनस्पतिशास्त्रातील वनस्पतींच्या वर्गीकरणाच्या पद्धतीनुसार निर्माण केले गेले. पण मानवी 'कुल' हे वनस्पती 'कुला'प्रमाणेच जसे नसते तसेच भाषांचे आहे. विवाहातील परंपरा व स्वातंत्र्य यामुळे जशी 'कुल' वैशिष्ट्ये बदलतात तसेच भाषांचेही होते. उदाहरणार्थ, 'मी येईन असे तो म्हणाला' आणि 'तो येईल असे तो म्हणाला' यातील फरक हा केवळ कालानुसारी एकाच कुलातील फरक नाही. इंग्रजीच्या मराठीशी आलेल्या संपर्कातच याचे कारण सापडते. मानवी समूहांचे संपर्क ऐतिहासिक कालातही होते. या संपर्कातून भाषांमध्ये होणारे बदल ऐतिहासिक भाषाशास्त्राने फारसे तपासले नाहीत. मराठीमध्ये शब्दांचे मूळ शोधण्याचे प्रयत्न बऱ्यात प्रमाणात झाले. वि० का० राजवाड्यांपासून विश्वनाथ खैऱ्यांपर्यंतचा प्रवास हा लक्षणीय आहे. मराठीमधील बऱ्याच शब्दांचा मूळ उगम संस्कृत, तमिळ, कानडी, फारसी या भाषांतून शोधण्यात आला. हे सर्व प्रयत्न स्तुत्य आहेत. मात्र कधीकधी या भाषांवरील कमी प्रभुत्वाचे फटके संशोधनात बसतात. उदाहरणार्थ, पानदानमधला 'दान' उत्तरप्रत्यय फार्सीचा, 'पात्र' या अर्थाचा. मराठीत तो 'दाणी' असाही होतो. पानदान, फुलदाणी, पिकदाणी. 'खानदान' हाही फार्सीतील शब्द. पण 'खान' व 'दान' यांची संगती दाखविताना अडचण होते. खरेतर मराठीवर अरबीचा संस्कार आधी झाला. फार्सीचा संस्कार नंतर झाला. मुळात अरबी-फार्सी यांचे ऐतिहासिक संबंध आपण तपासलेलेच नाहीत.

सस्यूरच्या सिद्धान्ताने भाषांचा इतिहास तपासण्याची ऊर्मी कमी झाली. प्रत्येक भाषा, विशेषत: भोवतालच्या जगात वापरली जाणारी जिवंत भाषा ही एक स्वयंपूर्ण व्यवस्था असते हे भान सस्यूरने दिले. या सिद्धान्तातील 'रचना' व 'चिन्ह' हे महत्त्वाचे शब्द. चिन्ह ठरविणे, चिन्हा-चिन्हातील संबंध तपासणे, चिन्ह-रचनेची मानवी भाषांतील वैशिष्ट्ये शोधणे या गोष्टींवरील संशोधन युरोप-अमेरिकेत महत्त्वाचे ठरले.

ब्लूमफील्ड, नायडा, हॅरिस वगैरे अमेरिकन संशोधकांनी भाषा व्यवस्थेच्या विश्लेषणाच्या पद्धतींवर व त्यासाठी आवश्यक असणाऱ्या साधनांवर भर दिला. त्यामागचे कारण अगदी व्यावहारिक होते. भारतात आधुनिक भाषाशास्त्र या साधनांचे आकलन व त्यांचा वापर यामार्गे आले. 'वर्णनात्मक भाषाशास्त्र' असे त्याचे नामकरणही झाले. पण सस्यूरच्या सिद्धान्ताची सर्वंकष दखल घेण्याची तसदी वर्णनात्मक भाषाशास्त्राने कधीच घेतली नाही. उदाहरणार्थ, भाषा ही 'गतिक व्यवस्था' आहे या सस्यूरच्या म्हणण्यातील 'गतिक'तेचा जणू विसरच पडला. 'वर्णनात्मक भाषाशास्त्र' हे ब्ल्यूमफील्ड, हॅरिस वगैरेंनी विकसित केलेल्या विश्लेषण साधनांचे उपयोजन या टप्प्यावर पोहोचले. मराठीतही असे उपयोजनांचे बरे-वाईट प्रयत्न झाले.

भाषाशास्त्र म्हणजे भाषा-नमुन्यांचे विश्लेषण ही संशोधनाची अगदी प्राथमिक अवस्था आहे असा विचार चॉम्स्कीने मांडला. माणसाच्या मनातील भाषा-क्षमतेचे स्वरूप समजावून घेणे, फक्त मानवालाच प्राप्त झालेल्या भाषा-क्षमतेची तत्त्वे शोधणे हे जनकसूत्री भाषाविज्ञानाचे प्रथमपासूनचे उद्दिष्ट होते व आहे. भाषाशास्त्र हे चॉम्स्कीच्या सिद्धान्ताने भाषाविज्ञान बनले. या सिद्धान्ताच्या उपयोजनामध्ये फारसा कुणाला रस नव्हता. या सिद्धान्ताचे पुन्हा पुन्हा समीक्षण करून तो अधिक व्यापक पण नेमका व सुटसुटीत करण्यावर भाषावैज्ञानिकांचा भर होता व आहे. विविध भाषांची जनकसूत्री व्याकरणे लिहिण्यात आली. पण त्यांनाही फारसे महत्त्व मिळाले नाही. याचे कारण विशिष्ट भाषेचे स्वरूप समजावून घेण्यापेक्षा मानवी भाषेबाबत - भाषाक्षमतेबाबत सिद्धान्तन करणे हे भाषाविज्ञानाचे उद्दिष्ट आहे.

वैज्ञानिक सिद्धान्ताच्या मागे न लागता भाषांच्या प्रत्यक्ष व्यवहारावर - विशेषत: सामाजिक व्यवहारावर लक्ष केंद्रित करण्याचा प्रयत्न करणारे भाषा - अभ्यासक अजूनही मोठ्या संख्येने आहेत. यातूनच भाषाव्यवहार - शास्त्र, सामाजिक भाषाविज्ञान, भाषा - अध्यापन यांसारखी व्यावहारिक निकड असलेली शास्त्रे जन्माला आली. सैद्धान्तिक पाठबळापेक्षा बौद्धिक शहाणपणाला या शास्त्रामध्ये महत्त्व होते व आहे. भाषेचे जतन, भाषेचा संपर्क - माध्यमातील वापर, भाषेचा साहित्यातील वापर, बहुभाषिक समाज, अल्पसंख्यांकाची भाषा, शिक्षणातील भाषेचे स्थान व भाषेचे शिक्षण, कोशनिर्मिती, भाषापर्यावरण, भाषाप्रदूषण, भाषा व सत्ता, भाषा व लिंगभेद अशा असंख्य क्षेत्रातील भाषेचा वापर अभ्यासण्यात आज अनेक संशोधक मग्न आहेत.

भाषाविज्ञानाऐवजी भाषेचा विविध अंगानी विचार करण्यावर आज जास्त ओढा दिसतो असे म्हणणे गैर नाही. भाषेच्या या विस्तृत परिप्रेक्ष्याच्या संदर्भात आपण कुठे आहोत आणि आपणाला काय करता येईल याचा विचार व्हावयास हवा.

३

सैद्धान्तिक संशोधन व भाषाव्यवहाराबाबतचे संशोधन असे संशोधनाचे दोन प्रकार मानल्यास सध्या तरी दुसऱ्या प्रकारचे संशोधन मराठी अभ्यासकांना करता येण्यासारखे आहे. मात्र संशोधन करण्यापूर्वी त्याच्या व्यावहारिक बाजू व त्याची पूर्वतयारी समजून घेणे अगत्याचे आहे.

ज्या विषयात संशोधन करायचे त्या विषयाचे सम्यक ज्ञान, त्या विषयातील आजवर झालेल्या संशोधनाची माहिती आणि स्वतःच्या चौकस बुद्धीची विशिष्टता यांची किमान अपेक्षा असते. भाषाविज्ञानाबाबत आज काय दिसते? हा विषय भाषांच्या विभागात एक लहानसा भाग म्हणून शिकविला जातो आणि तोही पदव्युत्तर स्तरावर. मराठी भाषक सर्वसामान्यपणे पदव्युत्तर स्तरावर इंग्रजी, मराठी, हिंदी व काही युरोपियन भाषा, जपानी वगैरे भाषा विभागात अध्ययन - अध्यापन करतात. मात्र साहित्याभ्यासाच्या प्रमाणात भाषाभ्यासाचे प्रमाण अत्यल्प असते. साहित्यसमीक्षा ही अनेकदा भाषाविषयक सिद्धान्त व तत्त्वज्ञान यांवर आधारित असते हे लक्षात घेता भाषाविज्ञानाची सशक्त जाण भाषाविभागातल्या अध्यापक - विद्यार्थ्यांना असणे किती गरजेचे आहे हे लक्षात येते. या विभागातील भाषाविज्ञानाचा कस व विस्तार केल्याविना मौलिक संशोधन अशक्य आहे.

निखळ भाषाविज्ञानाचे अध्ययन करणे हे अंतिमतः संशोधनासाठी आवश्यक असले तरी मराठी अभ्यासकांनी त्याकडे उदासीन दृष्टीनेच पाहिले आहे. परिणामतः इंग्रजी विभागातला मराठीभाषक अध्यापक वा विद्यार्थी हा भाषाविज्ञानातील तज्ज्ञ मानण्याची आपत्ती येते. पदवी शिक्षणापासून ते पदव्युत्तर शिक्षणापर्यंत भाषाविज्ञानाची तरतूद केली नाही तर मराठी भाषेवरचे संशोधन गुणवत्तेमध्ये टिकण्याची फारशी शक्यता नाही. केवळ भाषाविज्ञानाचा अभ्यास हा व्यवहारोपयोगी आहे. वृत्तपत्रविभाग, जाहिरातकला, भाषांतरप्रकल्प, कोशरचना, प्रसार-माध्यमे यांसारख्या क्षेत्रांत भाषाविज्ञानाचे ज्ञान असणारा अधिक काम करू शकतो. त्याची विश्वासार्हता अधिक असते. भारतात स्वतःच्या प्रशिक्षणार्थींना इंग्रजीचे प्रशिक्षण देण्यासाठी गुगलसारखी संस्था फक्त भाषाविज्ञानातील पदवीधारकांनाच आमंत्रित करतात हे वास्तव पुरेसे बोलके आहे.

भाषाविषयक संशोधन केवळ विद्यापीठीय स्तरावर होते किंवा व्हावयास हवे असे नाही. भाषेविषयी कुतूहल असणाऱ्या कोणालाही ते करता येते - आपण तशी तरतूदही करायला हवी. पीएच०डी० पदवीसाठी केलेले संशोधन बाजूला ठेवले तर मराठी भाषा संशोधनाची सोय कोठे आहे? जवळपास कोठेही नाही. मराठी कोशाच्या प्रकल्पात

गेली ३०-५५ वर्षे खर्च केल्यावर कोशविषयक तज्ज्ञ व संशोधक निर्माण होणे अगदी शक्य होते. पण ते झाले नाही. पैसा खर्च झाला; पण हाती फारसे काही लागले नाही. याचे एक प्रमुख कारण म्हणजे या प्रकल्पात भाषावैज्ञानिक कधीही नव्हते. कोशरचना हे केवळ हौसेचे काम नसून त्यामागे भाषाविज्ञानाची जाण आवश्यक आहे हे आपणास  समजेल त्या दिवसाची वाट पाहूया.

विद्यापीठीय विभागांखेरीज राज्य मराठी विकास संस्था यांसारख्या शासकीय व काही अशासकीय संस्था या संशोधनासाठी सबल करायला हव्यात. अशा संस्थांच्या संशोधनाकडे विद्यापीठ - विभाग भरवशाने पाहतील अशी व्यवस्था निर्माण करायला हवी. अशा संस्थांना वय, कागदोपत्री मान्यता, सेवाज्येष्ठता यासारख्या व्यावहारिक गोष्टींच्या अडचणी बाजूला सारून संशोधनासाठी पूर्ण स्वातंत्र्य देता येणे शक्य आहे. मराठी भाषाविज्ञान संशोधनाला आजच्या परिस्थितीत अशा संस्थाच साहाय्यकारी होतील.

संशोधनकार्यात पद व सत्ता यापेक्षा ज्ञान व त्याचा अधिकार हेच महत्त्वाचे असतात याचा विसर आपण पडू देता कामा नये. तरुण संशोधक निर्माण करण्याची आणि ते निर्माण झाल्यावर त्यांना मुक्तपणे संशोधन करू देणारी परिस्थिती करणारी व्यवस्था निर्माण करण्याचे अवघड काम आपण केले तरच मराठी भाषा संशोधनाची परंपरा आपल्याला निर्माण करता येईल.

४

भाषा-संशोधन पद्धतीमधील काही आवश्यक घटकांचा विचार करायला हवा.

भाषाविषयक संशोधन - विशेषतः भाषा व्यवहाराबाबतचे संशोधन हे घरी बसून करण्याचे काम नव्हे. क्षेत्रीय पाहणी ही आवश्यक बाब आहे. एखादा भाषाविषयक मुद्दा, विशेष प्रथम लक्षात यावयास हवा. त्यानंतर क्षेत्र निवडावयास हवे. क्षेत्रीय पाहणीसाठी योग्य काल द्यावयास हवा. अनेकदा अभ्यासक प्रथम आपल्या सोयीचे क्षेत्र ठरवतो व नंतर संशोधनविषय ठरवतो. ही पद्धती सुखावह व सोयीची असली तरी तिचा उपयोग फारसा होत नाही. सर्वेक्षणात फक्त आपल्या माहितीच्या चार-पाच लोकांचा समावेश करणे ही दुसरी प्रवृत्ती. भाषकांच्या संख्येनुसार नमुना - भाषकांची संख्या व पाहणीक्षेत्रे ठरवावयास हवीत. हे परिश्रम घेतल्याविना केले जाणारे संशोधन हे फारच जुजबी ठरते, त्यातील तथ्ये सहजपणे खोडून काढता येतात. उदाहरणार्थ, 'तो गेला होता' आणि 'तो गेलेला' याचा वापर 'माझी कोल्हापूरची आत्या 'गेलेला' असं म्हणते यावर सोडून देता येणार नाही. बोली, स्थळ, वय, दोन्ही

भाषकांचे परस्पर संबंध इ. गोष्टी सर्वेक्षण करूनच तपासाव्या लागतील.

प्रश्नावली तयार करणे ही एक आवश्यक पण जिकिरीची गोष्ट आहे. एकाने विशिष्ट कारणासाठी वापरलेली प्रश्नावली दुसऱ्यास दुसऱ्या कामासाठी जशीच्या तशी वापरता येणार नाही. अर्थक्षेत्रे आणि सांस्कृतिक क्षेत्रांची वैशिष्ट्ये लक्षात घेऊनच प्रश्नावली तयार करायला हवी. मुख्य म्हणजे एकदा तयार केलेली प्रश्नावली ही क्षेत्रीय अनुभवानुसार पुन्हा पुन्हा संस्कारित करायला हवी. प्रश्नावलीचा वापर हा कौशल्याचा भाग असतो. मुलाखत घेतल्याप्रमाणे नमुना - भाषकाकडून माहिती मिळवायची नसते. भाषेचा नमुना हा सहजनिर्मित असण्यासाठी नमुना - भाषकाला मोकळेपणाने बोलू देणे आवश्यक असते. त्यासाठी संशोधकाला सहनशीलता हवी. मुख्य म्हणजे नमुना - भाषकाशी मित्रत्वाने संवाद साधण्याचे कसब त्याकडे हवे. एकट्याने क्षेत्रीय पाहणी करण्यापेक्षा संघाने करण्यात यातले अनेक धोके टाळता येतात. उदाहरणार्थ, एखाद्याच्या हातात प्रश्नावली असेल तर दुसरा संवाद साधू शकतो व तिसरा नोंदी ठेवणे, शक्य असल्यास ध्वनिमुद्रण करणे इ० गोष्टी करू शकतो. क्षेत्रीय पाहणीत नमुना - भाषकांच्या सोयीनुसार वेळ द्यावा लागतो. आपल्या कामाच्या वेळेत त्याला वेळ असेलच असे नव्हे. जेवणखाण, विश्रांती अशा गोष्टींना संशोधकाला प्रसंगी मुरड घालावी लागते.

दर दिवशी जमा केलेल्या भाषा-सामग्रीचे श्रवणप्रत्ययी लेखन तपासणे, जमा केलेल्या भाषा सामग्रीबाबतची निरीक्षणे नोंदविणे, आधीच्या निरीक्षणांशी त्यांचा ताळमेळ बसविणे, दुसऱ्या दिवशीच्या सर्वेक्षणावर कोणत्या विशिष्ट भाषा-बाबींवर लक्ष द्यायचे आहे हे ठरविणे, संघातील प्रत्येकाचे काम ठरविणे या गोष्टी करणे आवश्यक आहे. दिवसभर हिंडल्यानंतर रात्री या सर्व गोष्टी करायला हव्यात. नमुना - भाषकाबाबतची निरीक्षणे स्वतंत्रपणे रोज नोंदवायला हवीत. हवी असलेली कामे विषयात रस नसेल तर कंटाळवाणी, दमछाक करणारी वाटतात; विषयात रस असेल तर अत्यंत आनंददायक, बुद्धीला चालना देणारी असतात.

सर्वेक्षण संपल्यानंतर भाषावैज्ञानिक दृष्टिकोणातून किंवा त्या शिस्तीतून त्याचा अहवाल तयार करावा; किमान त्याची टाचणे तयार करावीत. ध्वनिमुद्रित व लिखित सामग्री वर्गवारी करून जतन करावी. तात्काळ प्रसिद्धीची घाई करू नये कारण केलेल्या कामाकडे मागाहून विविध अंगांनी पाहाता येते, त्यातल्या त्रुटी लक्षात येतात, आणखी नमुने जमविण्याची किंवा काही गोष्टी तपासण्याची तरतूद करता येते. केवळ भाषाविश्लेषण हाच उद्देश असेल तर कोणत्या सिद्धान्ताच्या आधारे ते करायचे हे ठरविणे फारसे अवघड नाही. पण सामाजिक भाषाविज्ञानात हे अशक्य असल्याने सामग्रीच्या विश्लेषणाचा, सादरीकरणाचा मार्ग शोधणे जिकिरीचे असते. सततचे वाचन

व खुली चर्चा - ज्यात अत्यंत प्रतिकूल टीकाही शांतपणे ऐकून तिच्यातील तथ्ये लक्षात घ्यावी लागतात - याची संशोधनास जोड असली तरच संशोधनाचे मोल वाढते.

५

सैद्धान्तिक भाषाविज्ञानात मराठीच काय पण भारतीय भाषावैज्ञानिक मोलाची भर घालू शकतील; नवे सिद्धान्त शोधू शकतील अशी आजची स्थिती नाही. उपलब्ध सिद्धांताना टिपा देण्याइतपतच आपली आजवरची प्रगती आहे.

पण भाषा - व्यवहाराबाबत विविध अंगांनी विचार करता येण्यासारखी अत्यंत सकस अशी भाषा - परिस्थिती महाराष्ट्रात आहे, भारतात आहे. आसाम आणि मेघालय ही राज्ये या अर्थाने अत्यंत संपन्न आहेत. महाराष्ट्रातही भाषा - व्यवहाराचे चित्र अत्यंत संश्लिष्ट आहे. केवळ एका भाषेवर भर देण्यापेक्षा माणसे वापरत असलेल्या विविध भाषांचा, बोलींचा अभ्यास करणे अधिक फलदायक ठरेल. लहान मुलांच्या भाषासंपादनाचा - विशेषत: बहुभाषी वातावरणातील लहानग्यांच्या भाषासंपादनाचा - प्रांत महाराष्ट्र अद्यापही दुर्लक्षित आहे. औपचारिक शिक्षण, त्याचे माध्यम व मुलाची भाषा यांची सांगड घालताना उडणाऱ्या धांदलीचे, निर्माण होणाऱ्या मनोहारी भाषा - चित्राचे स्वरूप काय व कसे आहे याकडेही आपण फारसे पाहिलेले नाही. केवळ वरवरचा त्रागा, अनाठायी भीती आणि भावनिक भविष्यकथन यापलीकडे आपण गेलेलो नाही. आणि या तीनही गोष्टींना संशोधनात किंमत नाही हे आपण लक्षात घेतलेले नाही. अभिव्यक्ती करण्याइतकाच अभिव्यक्ती दडविण्यासाठीही समाजात भाषेचा वापर होतो. दूरदर्शनवरच्या मुलाखती, सूत्रसंचालन, राजकीय व्यक्तींची भाषणे व निवेदने, कीर्तन-प्रवचन-वक्तृत्व यात पारंगत असणारे लोक, शिष्टाचार आणि दंभ यांच्या सीमारेषा पुसट करणारा भाषाव्यवहार या गोष्टी या अंगाने तपासता येतील. मानव या प्रजातीने जगताना जगण्यासाठी उत्क्रांत केलेली भाषा व निर्माण केलेली सांस्कृतिक वलये यांचा इतिहास पाहून मानवी संस्कृती व मानवी भाषा यांची आजची अवस्था याबाबत संशोधन करणे शक्य आहे - मराठी भाषावैज्ञानिकांनी किंवा कोणत्याही भाषावैज्ञानिकांना ही झेप घेण्याची सूक्ष्म इच्छा या चर्चासत्रात निर्माण झाल्यास ते एक मोठेच शुभचिन्ह ठरेल.

■

'शरण्य', स्वेदगंगा सोसायटी, वारजे, पुणे 411 052.
दूरभाष (020) 2523 0816








# मुलांचा भाषाविकास

वर्षा सहस्रबुद्धे

**(भारतीय अर्थविज्ञानवर्धिनी, पुणे या संस्थेतर्फे केलेल्या पुणे मनपाच्या मराठी माध्यमाच्या प्राथमिक शाळांमधील विद्यार्थ्यांच्या आकलनाबाबतच्या पाहणीवर आधारित निरीक्षणे)**

- **पाहणीचा हेतू**

प्राथमिक शिक्षणाच्या गुणवत्तेबाबत ही पाहणी करण्याचे ठरले, त्यामागे प्राथमिक शिक्षणाच्या दर्जाविषयीची निखळ आस्था होती. शाळांमधील विद्यार्थ्यांचे शिकणे अर्थपूर्ण व्हावे तसेच त्याची गुणवत्ता वाढावी यासाठी काय करणे आवश्यक आहे, कोणत्या विषयातील कोणत्या भागासाठी ही गरज अधिक आहे आणि यासाठी प्रत्यक्ष कोणते उपाय करता येतील याचा वेध घेण्यासाठी अभ्यास करण्याचे ठरले.

माध्यमभाषा मराठी असल्यामुळे इतर विषयांच्या आकलनासाठी मराठीवरील प्रभुत्वाचे महत्त्व निर्णायक ठरते. मराठीवर प्रभुत्व मिळवण्यात येणाऱ्या अडचणींचा बारकाईने व साकल्याने अभ्यास व्हायला हवा, त्यावर उपाययोजना व्हायला हव्यात, तरच मुलांना इतर विषय उत्तम समजतील. मराठीमधल्या बाराखडीचिन्हांच्या वा जोडाक्षरांच्या ओघवत्या वाचनलेखनापाशीच अगणित मुले अडलेली असतील तर गणितातल्या, विज्ञानातल्या, इतिहासातल्या, भूगोलातल्या क्लिष्ट शब्दांचे आकलन, वाचन, लेखन मुलांना येणार नाही, तसेच कठीण संकल्पना समजणार नाहीत हे उघड आहे. म्हणून मुलांच्या शिकण्यातल्या नेमक्या अडचणी समजाव्यात या हेतूने पाहणी करण्याचे ठरले.

ऑगस्ट व सप्टेंबर २००७मध्ये केलेल्या पाहणीचा सविस्तर वृत्तांत तयार करण्यात आला आहे. पाहणीची पार्श्वभूमी, पाहणीसाठी वापरलेल्या चाचण्या कशा तयार केल्या, त्यांचे स्वरूप काय होते, पातळीनिश्चिती कशी केली गेली, चाचणी देणाऱ्या गटाची निवड आणि प्रशिक्षण कसे केले, चाचणी प्रत्यक्ष देताना काय काळजी घेतली याबाबत तपशीलवार विवेचन त्या वृत्तांतात आहे. महत्त्वाची सांख्यिकी माहिती आणि त्यातून निघणारे निष्कर्ष तसेच उपायात्मक पद्धतींची दिशा काय असायला हवी यावरील विवेचन हे त्या वृत्तांताचे महत्त्वाचे भाग आहेत.





अनुक्रमणिका

या पाहणीवर आधारित असलेली मुलांच्या भाषाविकाससंबंधीची निरीक्षणे प्रस्तुत टिपणात मांडली आहेत.

● **चाचण्यांची निर्मिती आणि स्वरूप**

मराठीच्या सुयोग्य चाचण्या विकसित करणे हे या पाहणीतील पहिले आव्हान होते. ज्यांना चाचणी द्यायची त्यापैकी बहुसंख्य मुले ही त्या त्या कुटुंबातली साक्षर होणारी पहिली पिढी आहे हे चाचण्या तयार करताना लक्षात घेतले.

मराठीच्या वा इतर पाठ्यपुस्तकांचा आशय समजला का नाही हे तपासणे हा या चाचण्यांचा उद्देश नव्हता, तर भाषिक विकासाच्या विविध अंगांच्या संदर्भात विद्यार्थी कोणत्या पातळीवर आहेत, त्या अंगांच्या विकासात काही अडचणी येत असल्यास, त्या कोणत्या याचा शोध घेणे हा या चाचण्यांचा उद्देश होता. म्हणून पुढील पाच अंगांनी भाषाविकासाची पातळी निश्चित करता येईल असे चाचण्यांचे स्वरूप विकसित केले - श्रवण आणि आकलन / मौखिक अभिव्यक्ती / आकलनासह वाचन / श्रुतलेखन / स्वतंत्र लेखन

इयत्ता दुसरीत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी स्तर एक, इयत्ता तिसरीत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी स्तर दोन, इयत्ता चौथीत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी स्तर तीन आणि इयत्ता पाचवीत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी स्तर चार, असे चाचणीचे चार स्तर होते.

चाचणीच्या प्रत्येक स्तरात पाच मुख्य प्रश्न होते व स्तर एकपासून स्तर चारपर्यंत त्यांची काठिण्यपातळी वाढणारी होती. दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या स्तरावरील विद्यार्थ्यांना आपापल्या स्तरावरील प्रश्नांना समाधानकारक उत्तरे देता न आल्यास त्यांना आधीच्या स्तरावरचा, त्याच भाषिक अंगासाठी असलेला, कमी काठिण्यपातळी असलेला प्रश्न विचारला जाईल अशी चाचणीची रचना होती. एका वेळी एकाच विद्यार्थ्याला चाचणी दिली गेली. प्रतिसादांची पातळी जिथल्या तिथे निश्चित करता येईल अशी पद्धत चाचणीसाठी विकसित केली. चाचणी देतेवेळच्या काही बाबी मुलांच्या प्रतिसादांवर आणि पर्यायाने चाचणीच्या यथार्थतेवर परिणाम करू शकतात अशा बाबी लक्षात घेऊन त्याबाबत योग्य ती काळजी घेतली होती. त्यामुळे निघालेले निष्कर्ष यथार्थ नसण्याची शक्यता फार कमी आहे. त्याबाबतचे तपशील मूळ वृत्तांतात 'चाचणीचे स्वरूप, चाचणी देणाऱ्या गटाची निवड आणि चाचणीची कार्यवाही' या प्रकरणात नोंदले आहेत.

● **आशय सोपा; परंतु प्रतिसाद असमाधानकारक**

भाषिक विकासाच्या वेगवेगळ्या अंगांच्या संदर्भात विद्यार्थ्यांनी कोणती पातळी गाठली आहे, तसेच बोलताना, शिक्षकाने बोललेले ऐकून शिकताना, वाचन शिकताना

आणि लेखन करताना मुलांना नेमक्या अडचणी कोठे येतात हे चाचण्यांमधून शोधले गेले. त्यासाठी केलेल्या पाहणीत वापरलेल्या चाचण्यांचा आशय हेतुपूर्वक अतिशय सोपा राखलेला होता. चाचणीच्या वेळी त्या त्या इयत्तेतील विद्यार्थ्यांनी अभ्यासक्रमानुसार कोणते शब्द, वाक्यरचना शिकणे अपेक्षित होते आणि त्या तुलनेत चाचणीत वापरलेला शब्दसंग्रह व वाक्यरचना किती सोप्या होत्या हे स्पष्ट करणाऱ्या दोन याद्या संदर्भासाठी अखेरीस दिल्या आहेत.

चाचणीचा आशय अत्यंत सोपा होता त्यामुळे सर्वच इयत्तांमधील विद्यार्थ्यांकडून सर्व भाषिक अंगांच्या संदर्भात उत्तम प्रतिसाद येतील अशी अपेक्षा होती. मात्र, वास्तवात तसे झालेले आढळले नाही, उलटपक्षी सर्व प्रश्नांत समाधानकारक प्रतिसाद दिलेल्या मुलांची संख्या खेद वाटावा एवढी कमी आहे असे पाहणीत दिसून आले.

पाहणीवरून भाषाविकासात मुलांना येणाऱ्या अडचणी स्पष्ट लक्षात येतात. हेही लक्षात येते की या अडचणी एकमेकींशी संलग्न आहेत आणि त्यांचा एकंदर परिणाम भाषाविकासाची गती कमी करण्यावर होतो. अगदी मोजक्याच मुलांनी भाषाविकासाच्या सर्व अंगांनी योग्य तो टप्पा गाठलेला आहे. एवढेच नाही तर काही मुलांच्या बाबतीत, वाचन व लेखनाच्या संदर्भात भाषाविकासाची गती चिंताजनक वाटावी एवढी कमी आहे आणि काहीजणांच्या बाबतीत या विकासाची सुरुवातच झालेली दिसत नाही. अशी अडचण असलेली मुले चौथ्या स्तरात म्हणंजे पाचवीतही आढळतात ही बाब गंभीर आहे. (संदर्भासाठी तक्ता क्र० तीन पाहावा.)

- **श्रुतलेखन व स्वतंत्र लेखन विशेष असमाधानकारक**

पाहणीत श्रवण आणि आकलन, मौखिक अभिव्यक्ती, आकलनासह वाचन, श्रुतलेखन आणि स्वतंत्र लेखन या पाच क्षमतांची तपासणी केली.

स्तरांनुसार निघणाऱ्या टक्केवारीत फरक असला तरी सर्वसाधारणपणे श्रुतलेखन आणि स्वतंत्र लेखन या क्षमतांच्या विकासासाठी शिक्षकांनी कोणत्या पद्धती वापराव्या याबाबत मार्गदर्शनाची विशेष गरज असल्याचे आढळले. मुलांनी स्वतंत्र लेखनात बोली भाषेत लिहिलेली वाक्ये व अपेक्षित वाक्यांच्या जवळपास असलेली वाक्येही स्वीकारली आहेत हे येथे लक्षात घ्यायला हवे. उदाहरणार्थ -

| चाचणीतील अपेक्षित शब्द वा वाक्ये | मुलांचे विविध प्रतिसाद |
|---|---|
| दप्तरात | : ददसरात, द्रपत्रात, द्रपतार, दपतरात, दपतारात, दपरात, दकतरात, दत्तरात, दस्पतरात, दबरात, दबतरात, दप्तारात, दप्यातारत, दब्तरात, डपतरात. |





अनुक्रमणिका

| चाचणीतील अपेक्षित शब्द वा वाक्ये | मुलांचे विविध प्रतिसाद |
|---|---|
| पोहायला | : पेहाला, पैहली, पोहला, पोवायला, पेहायल, पेहायला, पोयल, पोहयाला, पोहाईल, फवायला, पुहायला, पुह्युला, पोखायला, पाहायला, पोयाला, पाहाला |
| थापली | : तपली, धापली, कापली, थाबली, ताभली, तापले, कापळी, ताबळी, ठापली, थोपली, थापला, टुपली, टापली, यापडी, कपली |
| मी खडूने रंगवते | : मा खडो रगवत |
| नंदाला जांभळ्या रंगाच्या बांगड्या आणल्या. | : नंदाला जाबळ बगळी अनली |
| शाळेला उशीर होईल म्हणून आई मुलाला उठवत आहे. | : आई मुलाला शाळा उशीर होते. |
| मुलीने हातात ऊस धरला आहे. | : मुली हातात ऊस दरली आहे. |

● **प्रमाण मराठीची अडचण हे आव्हान**

मराठी माध्यमाच्या सर्व पाठ्यपुस्तकांतील भाषा प्रमाण मराठी आहे. म्हणून, एकंदर आकलनासाठी प्रमाण मराठीवरील किमान पातळीपर्यंतचे प्रभुत्व आवश्यक आहे. चाचणीच्या प्रश्नांची भाषा प्रमाण मराठीच होती. पाहणी पूर्ण झाल्यावर प्रतिसादांची फेरपाहणी केली आणि मुलांना प्रमाण मराठी ऐकण्यात, समजण्यात, वाचण्यात किंवा लिहिण्यात अडचण आहे किंवा कसे याचा शोध घेतला. प्राथमिक शिक्षणाच्या सार्वत्रिकीकरणासाठी चालू असलेल्या प्रयत्नांमुळे, ज्यांची मातृभाषा प्रमाण मराठीपेक्षा निराळी आहे अशा मुलांची शाळांमधील संख्या लक्षणीय प्रमाणात वाढली आहे. हे वास्तव लक्षात घेऊन पाहणी करताना, मुलांचे प्रमाण मराठीत नसलेले तोंडी वा लेखी प्रतिसाद स्वीकारले आहेत. त्याचा परिणाम समाधानकारक प्रतिसादांची टक्केवारी वाढण्यात झालेला आहे. निव्वळ प्रमाण मराठीतले प्रतिसाद स्वीकारले असते तर समाधानकारक प्रतिसादांची टक्केवारी आणखीच खालावलेली दिसली असती.





अनुक्रमणिका

अडचणी निव्वळ आकलनाशी संबंधित किती आणि प्रमाण मराठीशी संबंधित किती याबाबतचे चित्र फेरपाहणीतून समोर येते. आपल्या घरी बोलल्या जाणाऱ्या बोली भाषेकडून प्रमाण मराठीकडे होणाऱ्या प्रवासात मुलांना अडचणी येतात आणि अशा मुलांची संख्या मोठी आहे हे लक्षात घेऊन, वर्गात भाषा शिकवताना वापरण्याच्या पद्धतीमध्ये ठोस बदल होण्याची गरज पाहणीतून समोर येते. वर्गात शिक्षकाला सक्षमतेने ही बाब हाताळता यावी यासाठी कोणत्याही दबावाला बळी न पडता तज्ज्ञ मंडळींच्या सल्ल्याने काही धोरणात्मक बदल करण्याची आवश्यकता आहे. मुलांची बोली भाषा आरंभीच्या टप्प्यावर किती काळ नेमकी कशी व किती प्रमाणात स्वीकारली तर प्रमाण भाषेच्या दिशेने होणारा त्यांचा प्रवास सुकर होतो याबाबत व्यापक व सखोल अभ्यास होण्याची गरज आहे. त्याच्या जोडीला बोली ते प्रमाण मराठी या प्रवासात मदत होईल असे 'सेतुसाहित्य' मोठ्या प्रमाणावर तयार होण्याचीही गरज आहे. भाषाशिक्षणविषयक धोरणात्मक बदलांच्या संदर्भात अशा अभ्यासांचा आधार घेतला जायला हवा. तरच सर्वांना प्रमाण भाषेच्या वाटा खऱ्या अर्थाने खुल्या होतील.

**● पाठ्यपुस्तकातील कठीण शब्द कळण्यात फार मोठी अडचण**

आधी उल्लेख केल्याप्रमाणे श्रुतलेखनात अडचण असलेल्या मुलांची संख्या सर्व स्तरात काळजी वाटावी एवढी मोठी आहे. श्रुतलेखनात प्रमाण मराठीतील सोपे शब्द लिहिण्याला ज्यांनी असमाधानकारक प्रतिसाद दिला त्या मुलांना, ऐकलेल्या शब्दांचा अर्थ कळलेला नसण्याची शक्यता नाकारता येणार नाही. परंतु, प्रमाण मराठीतील एवढे सोपे शब्दही मुलांना कळत नसतील तर पाठ्यपुस्तकातील आणखी कठीण शब्द कळण्यात फार मोठी अडचण असणार असा थेट निष्कर्ष निघतो. उदाहरणादाखल दिलेल्या शब्दांचा तक्ता क्र० एक व दोन संदर्भासाठी पाहावा.

**● कळलेले लिहिण्यात अडचण**

श्रवण आणि आकलनाच्या प्रश्नांत, जे उत्तरे लिहू शकले नाहीत; परंतु ज्यांना उत्तर तोंडी देता आले अशा विद्यार्थ्यांचे गुण कमी केलेले नाहीत.

इयत्ता पाचवीच्या १२४ पैकी १०५ विद्यार्थ्यांना ज्या प्रश्नांची उत्तरे तोंडी देता आली; ती लिहिता आलेली नाहीत. चौथीच्या १९८ पैकी १३० विद्यार्थ्यांना ज्या प्रश्नांची उत्तरे तोंडी देता आली, ती लिहिता आलेली नाहीत. याचा अर्थ असा की ज्यांना जे कळले ते लेखी स्वरूपात मांडण्यामध्ये अडचण आहे.

**● श्रुतलेखनाला प्रतिसाद चिंताजनक**

आधी उल्लेख केल्यानुसार चाचणीचा आशय त्या त्या इयत्तेच्या अपेक्षित शब्दसंग्रहापेक्षा व वाक्यरचनापेक्षा खूप सोपा होता व श्रुतलेखनाचा प्रश्नही त्याला





अनुक्रमणिका

अपवाद नव्हता. तरीही चाचणी दिली त्या वेळी मुलांना चौथी आणि पाचवीच्या पाठ्यपुस्तकातील कोणते शब्द येणे अपेक्षित होते ते पाहिले तर या वास्तवाचे गांभीर्य अधोरेखित होते. श्रुतलेखनाला कोणती वाक्ये दिली याच्या संदर्भासाठी परिशिष्ट तक्ता क्र० ४ पाहा.

- **प्रमाण मराठीत सोपी वाक्ये सुसंगत लिहू शकणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या काळजी वाटावी एवढी कमी**

पाहणीनुसार स्तर चार (इयत्ता पाचवी) मधील ५३% विद्यार्थ्यांना प्रमाण मराठीत अतिशय सोप्या आशयाच्या वाक्यरचना करायला जमले आहे. स्तर तीन (इयत्ता चौथी) मध्ये हे प्रमाण ३८% आहे. स्तर दोन (इयत्ता तिसरी) मध्ये ते ४२% आहे, तर स्तर एक (इयत्ता दुसरी) मध्ये ते १६% एवढे कमी आहे.

पाहणीत लेखनाच्या बाबतीत स्तरांनुसार काय अपेक्षा होती हे पाहिले तर वरील टक्केवारीकडे किती गंभीरपणे पाहण्याची गरज आहे हे ध्यानात येईल. संदर्भासाठी परिशिष्टातील तक्ता क्र० ५ पहावा.

या वयाच्या मुलांना विचारप्रवृत्त करण्यासाठी मूर्त स्वरूपातील चेतक देणे मानसशास्त्रीय दृष्ट्या उपकारक ठरते. म्हणून केवळ कल्पनेने चार वाक्ये लिही असे न सांगता आवर्जून त्यांच्यासमोर वस्तू ठेवल्या. या वस्तुरूप चेतकांची निवड करताना प्रत्येक स्तरावर मुलांचे वय आणि आवड लक्षात घेतली होती. शिवाय प्रतिसाद देताना एकच एका साचेबंद उत्तराची अपेक्षा नव्हती. बहुदिश विचाराला आणि मुलांमधील विविधतेला वाव मिळेल अशी प्रश्नांची रचना होती. लेखनाला पुढील चेतकांच्या द्वारा आधार पुरविला होता.

- कागद, गोळी, वही आणि रंगीत खडू या परिचित वस्तू बघणे.
- कागदाची होडी बनवताना बघणे आणि त्याचे वर्णन करण्यासाठी पूरक शब्द ऐकणे.
- पतंग उडवणारी मुले आणि हातात ऊस घेतलेली मुलगी यांची रंगीत चित्रे पाहणे.

या चेतकांवर आधारलेल्या लेखी प्रतिसादातील वैविध्य सूचित करणारी काही वाक्ये उदाहरणादाखल पाहू. या वाक्यांचा आशय न बदलता दुरुस्त्या करून वाक्ये दिली आहेत -

- कागद पांढरा आहे - तो कागद आहे आणि तो फाटलेला आहे - कागद आयत आहे.
- हे पान फाटलेले आहे- कागद कोरा आहे- कागद चौकोनी असतो.





अनुक्रमणिका

- एका मुलाने दुसऱ्याच्या खांद्यावर हात ठेवला आहे. - दोघांनी दोन्ही बाजूंनी पतंग धरला आहे.
- एकाने टोपी घातली आहे. - एक मुलगा म्हणतो, ''आपण पतंग उडवू.''

मुलांची वाक्ये आशयाच्या व रचनेच्या दृष्टीने साधी आणि सोपी आहेत. शालेय अभ्यासक्रमानुसार मात्र त्यांनी याहून अधिक कठीण आशय मांडण्याची आणि गुंतागुंतीच्या वाक्यरचना लिहिण्याची अपेक्षा आहे. उदाहरणार्थ : पाठ्यपुस्तकातील काही प्रश्न व त्यांची अपेक्षित उत्तरे -

**१ इतिहास (इ० चौथी)**

थोडक्यात माहिती लिहा : संतांच्या कामगिरीचा परिणाम

- संतांच्या कार्यामुळे लोकजागृती झाली. धर्माबद्दल आदर वाढला. लोकांच्या मनात आत्मविश्वास निर्माण झाला. संतांच्या कामगिरीचा शिवरायांनी स्वराज्यस्थापनेसाठी उपयोग करून घेतला.

**२ भूगोल (इ० चौथी)**

थोडक्यात माहिती लिहा : वार्षिक गती

- पृथ्वी स्वत:भोवती फिरता फिरता सूर्याभोवती फिरते. पृथ्वीला सूर्याभोवती एकं फेरी पूर्ण करण्यास ३६५ दिवस लागतात. या कालावधीला वर्ष म्हणतात. म्हणून या गतीला वार्षिक गती म्हणतात.

सध्याच्या शिक्षणव्यवस्थेत मुलांचे मूल्यमापन करण्यात लेखी परीक्षेचे माध्यम सर्वात जास्त प्रमाणात वापरले जाते. दहावीची शालान्त परीक्षाही याला अपवाद नाही. लिहिता येण्यामुळे प्रत्यक्ष जीवनातही व्यक्तीच्या सबलीकरणाला मोठाच हातभार लागतो. असे असताना, मुलांना सोप्या मजकुराचे प्रमाण मराठीत सुसंगत लेखन करता येत नाही. याकडे विशेष लक्ष देण्याची गरज दिसते.

बोली भाषेत वाक्यरचना करू शकलेल्या मुलांचे गुण पाहणीत कमी केलेले नाहीत. बोली वा प्रमाण मराठीत वाक्ये लिहू शकलेल्या मुलांची संख्या इयत्तेनुसार वाढत जाताना दिसते. निरीक्षण करून, विचार करून ते प्रमाण मराठीत वा बोलीत शब्दबद्ध करायला ज्या मुलांना जमले आहे त्यांची टक्केवारी - इयत्ता दुसरीतील २८% विद्यार्थी, इयत्ता तिसरीतील ७३% विद्यार्थी, इयत्ता चौथीतील ८४% विद्यार्थी व इयत्ता पाचवीतील ८८% विद्यार्थी.





अनुक्रमणिका

पाचवीतील या ८८% विद्यार्थ्यांचे दोन भाग पडतात - प्रमाण भाषेत लिहिता आले असे ५३% आणि बोली भाषेत लिहिता आले असे ३५%

इयत्ता पाचवीत प्रमाण भाषेत लिहिता आलेल्या विद्यार्थ्यांची संख्या लक्षात येण्या-इतकी वाढते. तरीही, ही वाढलेली संख्याही ५३% एवढीच आहे. प्रमाण भाषेत सुसंगत वाक्यरचना करण्याएवढे प्रभुत्व मिळवण्यासाठी या विद्यार्थ्यांना चौथीपर्यंतचा चार वर्षांचा कालावधी लागला असे म्हणावे लागेल.

पाचवीच्या ३५% विद्यार्थ्यांकडे निरीक्षणावर आधारित वा आपल्या अनुभवाशी निगडित असे लेखन करण्याची इच्छा आहे, त्यांना वाक्यरचनाही करता येते; परंतु त्यांचे प्रमाण मराठीवर आवश्यक तेवढे प्रभुत्व नाही.

इयत्ता दुसरीच्या टप्प्यावर बोली किंवा प्रमाण भाषेत एक वाक्य लिहायला जमणारे विद्यार्थी केवळ २८% एवढे कमी आहेत. विद्यार्थ्यांना सुसंगत वाक्ये लिहिता यावीत यासाठी याआधींच्या टप्प्यापासून म्हणजे पहिलीपासूनच उपायात्मक बदल करण्याची नितांत आवश्यकता आहे.

- मुलांच्या श्रुतलेखनात व स्वतंत्र लेखनात ज्या चुका आढळल्या त्यांची वर्गवारी पुढीलप्रमाणे -

(मुलांना जे म्हणायचे आहे ते वाक्य वा तो शब्द कंसात दिला आहे. मुलांनी विरामचिन्ह वापरले नसल्यास तो मजकूर तसाच दिला आहे.)

**१. अयोग्य वाक्यरचना करणे, गुंतागुंतीचा आशय योग्य शब्दात मांडता न येणे.**

उदाहरणार्थ - बस चूक आई गाई करा

(बस चुकेल म्हणून आई घाई करत होती.)

- एक कागद चावकन दामटला चावकान ताजामदा हात घटला.

(एक चौकोनी कागद घेतला. तो दुमडला. त्याच्यामधे हात घातला.)

**२. शब्द चुकीच्या जागी तोडणे किंवा जोडणे.**

उदाहरणार्थ - हाव दापशी (हौदापाशी),

त्यांच्यालगणात ब्यां टबाजवला. (त्यांच्या लग्नात बॅण्ड वाजवला.)

**३. सामान्यरूप न करता वाक्य लिहिणे.**

उदाहरणार्थ - कपडेचा रंग, बटाटेची भाजी

**४. चुकीच्या लेखनामुळे अर्थविपर्यास.**

उदाहरणार्थ - धूळ घालून खूप लाडू केले. (गूळ घालून खूप लाडू केले.)

**५. सर्वनामांच्या वापराचा अभाव.**

उदाहरणार्थ - एका मुलीच्या हातात ऊस आहे एका मुलीच्या मागे शेत आहे

एका मुलीचे कपडे पिवळे आणि निळा ड्रेस घातला आहे. (...तिच्या मागे...तिचे कपडे...)

**६. जोडाक्षरलेखनात अडचण**

जोडाक्षरलेखन न येणे. उदाहरणार्थ - दपतरात (दप्तरात)

जोडाक्षरलेखन चुकीचे करणे. उदाहरणार्थ - कॅयक्रमात (कार्यक्रमात)

अनावश्यक जोडाक्षर लिहिणे. उदाहरणार्थ - बट्याट्याची (बटाट्याची)

जोडाक्षराऐवजी आधीच्या अक्षरावर अनुस्वार देणे. उदाहरणार्थ - चिंकू (चिक्कू)

**७. प्रमाण मराठीच्या जागी बोली उच्चारांनुसार लेखन करणे**

उदाहरणार्थ - अरदा (अर्धा), गेतले (घेतला), जाली (झाली), सारके (सारखे),

- पहिले कागत घेतले मंग गागदाला मिदडले. मंग ऐका बाजीला मिदडले मंग झहाज तयार झाला. (पहिल्यांदा कागद घेतला. मग कागद दुमडला. मग एका बाजूला दुमडले. मग जहाज तयार झाले.)

**८. योग्य व्यंजनाऐवजी निराळे व्यंजन लिहिणे.**

उदाहरणार्थ - कपात उकर (कपाट उघड), धुट (बूट), तापले (थापली), गूर (गूळ).

**९. बाराखडीचिन्ह चुकीच्या अक्षरावर देणे.**

उदाहरणार्थ - नेव (नवे), लाला (लाल).

**१०. चुकीचे बाराखडीचिन्ह देणे.**

उदाहरणार्थ - गुळी गुड आहे (गोळी गोड आहे.),

भाकरे तापले आने भाजले (भाकरी थापली आणि भाजली),

तोजू जुने बेट ईते ठेव (तुझे जुने बूट इथे ठेव),

खेप लाडू किले (खूप लाडू केले).

इयत्ता पाचवीमध्ये लेखनातील चुकांचे प्रमाण कमी झालेले आढळते.

एकंदरीने लेखनाच्या विकासाबाबत असे दिसते की लेखनाबाबतच्या ज्या संकल्पनांवर आणि कौशल्यावर इयत्ता पहिलीच्या अखेरीस प्रभुत्व मिळावे अशी अपेक्षा अभ्यासक्रमात आहे त्या कौशल्यांचा सहज वापर करण्याएवढे प्रभुत्व मिळवण्यासाठी मुलांना चौथीपर्यंतचा चार वर्षाचा कालावधी लागतो.

- **लेखन अक्षमता तपासण्यासाठी मराठीत प्रमाणित चाचणी नाही**

इंग्रजी भाषेच्या लेखन अक्षमतेच्या बाबतीत संशोधन झाले आहे व त्यावर

आधारित असलेल्या काही निकषांनुसार मुलांमध्ये लेखन अक्षमता आहे काय हे शोधता येते. या अक्षमतेच्या कारणांचा विचार करताना पुढील शक्यता संशोधकांना दिसतात-

१. अक्षराची पाहिलेली प्रतिमा मुलाच्या लक्षात राहात नाही.

२. अक्षराची प्रतिमा लक्षात राहिली तरी हातातून उतरत नाही.

३. लिहिण्यासाठी वापरले जाणारे स्नायू कमकुवत असू शकतात.

४. कारक स्मरण (मोटर मेमरी) सदोष आहे.

५. लिहिण्यासाठी आवश्यक अवकाशीय जाणिवांचा विकास पुरेसा झालेला नाही.

(ओनिता क्रा, १९९८)

यापैकी एका अथवा अधिक शक्यतांमुळे या पाहणीमधील नमुन्यातील लेखनासारखे लेखन मराठी विद्यार्थ्यांच्या हातून होत असणे शक्य आहे. आमच्या माहितीनुसार, देवनागरी लिपीसाठी अशा प्रकारची कोणतीही प्रमाणित चाचणी उपलब्ध नाही. पाहणीत आढळलेल्या व्यंजनांच्या, बाराखडीचिन्हांच्या आणि जोडाक्षरांच्या लेखनाबाबतच्या चुका आणि त्यांचे प्रमाण पाहता मराठीत 'लेखन अक्षमता' नेमके कशाला म्हणायचे याचे निश्चितीकरण करण्यासाठी संशोधन होण्याची गरज आहे.

मराठी लिहिताना मुलांनी अक्षरांची उलटापालट केली आहे का, किती मुलांनी अशी उलटापालट केली आहे याची सांख्यिकी माहिती पाहिली तर असे आढळते की अशा मुलांची संख्या नगण्य म्हणता येईल इतकी कमी आहे. मात्र त्याचबरोबर असे आढळते की **बाराखडीचिन्हे चुकीची वा चुकीच्या अक्षरांवर दिली आहेत अशा मुलांची संख्या दखल घेण्याएवढी मोठी आहे.** स्तर एक (इयत्ता दुसरी)मध्ये असे ३६% विद्यार्थी आढळले, स्तर दोन (इयत्ता तिसरी) मध्ये असे ३९% विद्यार्थी आढळले. दोन्ही स्तरात काहीच लिहिता न आलेल्या विद्यार्थ्यांना हा निकष लावताच येत नाही. त्या विद्यार्थ्यांची संख्या यात मिळवल्यास ते प्रमाण अनुक्रमे ७६% व ४५% एवढे दिसते.

मुलांचे हस्ताक्षर वाचता येण्याजोगे आहे की नाही हे ठरविण्याचा वस्तुनिष्ठ मापदंड नाही. ज्यांचे लेखन सुवाच्य नसल्यामुळे वाचकाला अडचण येते, अशा विद्यार्थ्यांच्या संख्येची मोजणी करता न आल्याने त्यांची आकडेवारी काढलेली नाही. **परंतु वाचता येईल एवढे बरे अक्षर घटवून घेण्याची गरज मुलांचे लेखन पाहिले की स्पष्टपणे जाणवते.**

वास्तविक, अन्य संदर्भातील निरीक्षणांवरून असे म्हणता येते की प्राथमिक शाळांमधील, अक्षर वळणदार असणाऱ्या शिक्षकांचे प्रमाण मोठे आहे. त्यांचे फलकलेखनही वळणदार असते. तरीही आपल्या पुष्कळ विद्यार्थ्यांचे अक्षर सुवाच्य नाही, बाराखडीचिन्हे नेमकी कोणती आणि कोठे द्यायची याबाबतही विद्यार्थ्यांची

गफलत होते. याचा अर्थ असा की **लिपी शिकवण्याच्या पद्धतींच्या औचित्याबाबत आणि प्रभावीपणाबाबत गांभीर्याने विचार व्हायला हवा.** मुलांमध्ये लेखन अक्षमता आहे का हे प्रमाणित चाचणीद्वारा जोपर्यंत सिद्ध होत नाही तोपर्यंत मुले लेखनासाठी सक्षम आहेत असे मानूनच लेखन शिकवण्याचे प्रयत्न करत राहायला हवे. क कमळाचा. ल लसणाचा व नंतर क, का, कि, की... असे घटवून, पारंपरिक पद्धतीत लेखन शिकून काही विद्यार्थी लेखनावर प्रभुत्व मिळवतात. मात्र बऱ्याच विद्यार्थ्यांना ती पद्धत सोईस्कर ठरत नाही असे दिसते. देवनागरी लिपीचे स्वरूप आणि वाचन-लेखनाबाबतचे प्रयोग व संशोधन यांच्या आधारे नव्या पद्धतींचा वापर का आणि कसा करायचा आहे शिक्षकांनी समजून घ्यायला हवे.

सर्व मुलांना लिपीचा उंबरठा ओलांडता यावा, लेखनाच्या किमान कौशल्यावर प्रभुत्व मिळवता यावे यासाठी **डी०एड०च्या अभ्यासक्रमात राज्यपातळीवर या पद्धतींचा अंतर्भाव व्हायला हवा.** त्याकरता जरूर ते धोरणात्मक निर्णय घेतले जायला हवेत आणि शिक्षणशास्त्र पदविकेची महाविद्यालये या पद्धतींच्या प्रसाराबाबत सुसज्ज होतील, जागरूकतेने त्यांचा अभ्यासक्रमात अंतर्भाव करतील याबाबत शासकीय अधिनियम बनविले जायला हवेत.

- **तुटक वाचनाचा आकलनावर परिणाम**

वास्तविक प्राथमिक शालेय अभ्यासक्रमानुसार सर्व मुळाक्षरे, सर्व बाराखडीचिन्हे व काही जोडाक्षरे यांनी युक्त अशा मजकुराचे ओघवते वाचन आणि लेखन विद्यार्थ्यांना इयत्ता पहिलीच्या अखेरीस येणे अपेक्षित आहे.

**ओघवते वाचन करता आले तर वाचलेल्या मजकुराचा अर्थ वाचकाला चटकन समजतो. मात्र अक्षरे व चिन्हे तोडत तोडत वाचन केले तर अर्थ समजण्यात पुष्कळ अडसर निर्माण होतात.** अर्थ समजून सहज वाचू शकणाऱ्या मुलांसाठी प्रमाण भाषेकडे जाणारी एक वाट खुली होते, मात्र अक्षरे वा चिन्हे तोडत तोडत वाचणाऱ्या मुलांसाठी ही वाट दीर्घ काळ बंदच राहते हे येथे लक्षात घेणे अगत्याचे आहे.

**अक्षरे वा चिन्हे तोडून वाचन करणाऱ्या मुलांचे प्रमाण दखल घेण्यासारखे आहे.** स्तर एक (इयत्ता दुसरी) मध्ये २७%, स्तर दोन (इयत्ता तिसरी) मध्ये २३%, स्तर तीन (इयत्ता चौथी) मध्ये ३३% व स्तर चार (इयत्ता पाचवी) मध्ये २०% विद्यार्थी तोडून वाचन करतात. स्तर एक व स्तर दोनमधील वाचताच न येणाऱ्या विद्यार्थ्यांचा यात अंतर्भाव केल्यास ते प्रमाण वाढून अनुक्रमे ४२% व २९% होते.

याही संदर्भात मुलांनी काय वाचणे अपेक्षित होते हे तपशिलात समजून घेतल्यास या प्रश्नाचे गांभीर्य लक्षात येईल. (संदर्भासाठी तक्ता क्र० ६ पहावा.)

● **मुलांमध्ये उपजत क्षमता असूनही एकंदर प्रतिसाद असमाधानकारक**

मौखिक अभिव्यक्ती, श्रवण व आकलन, स्वतंत्र लेखन या अंगांशी संबंधित प्रश्नांच्या प्रतिसादांच्या द्वारा मुलांमधल्या काही उपजत क्षमता चाचपता येतील अशी आशयाची रचना होती. आशय मुलांच्या दैनंदिन जीवनानुभवांशी जोडलेला असा होता. त्याला आलेल्या प्रतिसादांनुसार बहुसंख्य मुलांमध्ये या उपजत क्षमता आहेत असे आढळले. निरीक्षण क्षमता, बहुदिश विचार आणि प्राथमिक स्वरूपातील कार्यकारणभाव या उपजत क्षमता मुलांमध्ये आहेत हे या चाचपणीत आढळते. असे असूनही चाचणीतील सर्व प्रश्नांत समाधानकारक पातळीवर असणाऱ्या मुलांचे प्रमाण अल्प आहे ही बाब निश्चितच धोकादर्शक आहे.

त्या त्या इयत्तेच्या अभ्यासक्रमाच्या संदर्भात चाचण्यांचा आशय अतिशय सोपा होता. त्यामुळे अपेक्षा अशी होती की बहुसंख्य विद्यार्थी चौथी पातळी सहज गाठतील. या संदर्भात भाषाविकासाच्या पाचही अंगांनी म्हणजेच सर्व प्रश्नात उत्तम म्हणजे चौथ्या पातळीवर किती विद्यार्थी आहेत हे स्तरानुसार पाहणे अगत्याचे ठरेल. हे प्रमाण अत्यंत खेद वाटावे एवढे कमी आहे.

● **उपायात्मक अध्यापनाच्या दिशेने**

श्रवणक्षमतेचा विकास हा संभाषण, वाचन, लेखन या तीनही क्षमतांच्या विकासासाठी पायाभूत ठरतो. आठवड्यातील मराठीच्या तेरा तासिकांपैकी किमान एका तासिकेचे नियोजन श्रवण आकलनासाठी करायला हवे. श्रुतलेखनाचा सराव अभिनव पद्धतींनी नेमाने दिला जायला हवा.

निरीक्षणासाठी विविध वस्तू, जागा, व्यक्ती आणि प्रसंग प्रत्येक शाळेच्या आसपास आणि प्रत्यक्ष शाळेतही सहज उपलब्ध असतात. लहान लहान गटात निरीक्षणावर आधारित बोलणे, वर्णन करणे, त्यानंतर प्रत्येकाने त्यापैकी पाच ते दहा वाक्ये लिहिणे अशा काही कृती दर आठवड्याला वर्गात व्हायला हव्यात.

अनेक मुलांना ओघवते वाचन करून मजकुराचा अर्थ समजून घेण्यात अडचण येते असे आढळते. सर्व मुलांना सहज व अर्थ समजून घेत वाचन करता यावे आणि वाचनातला आनंद अनुभवता यावा यासाठी लिपिचिन्हे शिकवण्याचे विविध मार्ग अनुसरता येतात. त्याबाबत शिक्षकांमध्ये जाणीव निर्माण होण्यासाठी सूत्रबद्ध रीतीने सातत्यपूर्ण प्रशिक्षण व्हायला हवे. लिहायला शिकणाऱ्या मुलांच्या दृष्टिकोणातून लेखनाचे तीन प्रकार होतात - अनुलेखन, श्रुतलेखन आणि स्वतंत्र लेखन.

स्वतंत्रपणे आपले म्हणणे, निरीक्षण, आपल्या मनातील विचार, मत, भावना किंवा कल्पना मांडणे म्हणजे स्वतंत्र लेखन लेखन शिकण्याचे हे खरे गाभाभूत उद्दिष्ट.





अनुक्रमणिका

आपल्या मनाने लहान लहान वाक्ये सांगण्याची आणि ती लिहिण्याची संधी मुलांना सुरुवातीपासून वरचेवर मिळायला हवी. फक्त ''पुढील प्रश्नांची उत्तरे लिही'' अशा प्रकारे धड्याखालील प्रश्नांची पाठ केलेली उत्तरे लिहिणे लेखनसामर्थ्यासाठी पुरेसे नाही.

मुलांच्या लेखनात त्यांची निरीक्षणे, दृष्टी, कल्पना, विचार दिसतात. त्यांचा आदर राखणेही या संदर्भात महत्त्वाचे ठरते.

बोली भाषेकडून प्रमाण भाषेपर्यंत नेण्यासाठी काही साध्या मार्गांचा नेमाने अवलंब करावा. बोली भाषेतील जे शब्द, रचना मुलांच्या लेखनात येतात, त्या शब्दांच्या, रचनांच्या याद्या बनवाव्या. त्यांचे प्रमाण मराठीतील पर्यायही त्याशेजारी लिहून काढावे व अशा याद्या वर्गात लावून ठेवाव्या. मुलांनी बोलीत लिहिल्यास यादीमधील प्रमाण पर्याय काय हे मुलाला स्वत:लाच शोधून काढायला सांगावे. हळूहळू मुलांना प्रमाण मराठीतील पर्यायांची सवय झाली की याद्यांच्या आधाराची गरज उरत नाही.

शिरोरेघा सरळ देणे, दोन शब्दांत पुरेसे अंतर ठेवणे, पूर्णविराम, स्वल्पविराम व इतर विरामचिन्हांचा वापर करणे याचा शिक्षकाने आग्रह धरायला हवा.

देवनागरीचे तिपदरी स्वरूप लक्षात घेता, म्हणजे, मात्रा, वेलांटी, अनुस्वार व रफार हे वरच्या बाजूला, अक्षरे मध्ये आणि उकार, ऋकार, मोडलेला पाय, ट, ड या अक्षरांना जोडून येणारा र (ट्र, ड्र), हे लक्षात घेता, आरंभीच्या काळात, दुसरीपर्यंत, मुलांनी एकरेघी वही दुरेघीप्रमाणे वापरणे इष्ट ठरते. अक्षरांचे वळण आणि चिन्हांची स्पष्टता यासाठी ते उपकारक ठरते.

पुणे म०न०पा०च्या मराठी माध्यमाच्या शाळांमध्ये या उपायात्मक पद्धतींचे स्वागत होईल, तेव्हाच या पाहणीचे काम खऱ्या अर्थाने पूर्णत्वाला गेले असे म्हणता येईल.

संदर्भ : नाक्रा, ओनिता. १९९८, चिल्ड्रन अँड लर्निंग डिफिकल्टीज. अलाइड पब्लिशर्स.

## परिशिष्ट

पाहणीसाठी वापरलेल्या चाचणीतील व पाठ्यपुस्तकातील शब्दसंग्रहाची तुलना : एक झलक

**तक्ता क्र० १**

| | |
|---|---|
| स्तर ४ श्रुतलेखनासाठी चाचणीतील वाक्यांत वापरलेले शब्द | पाचवीच्या पाठ्यपुस्तकातील सप्टेंबरपर्यंतच्या शब्द-संग्रहातील ७५ नमुना-शब्द (ज्यावेळी विद्यार्थ्यांची चाचणी घेतली त्या वेळी त्यांना शाळेत अभ्यासक्रमानुसार हे शब्द लिहिता येणे अपेक्षित होते.) |





अनुक्रमणिका

| | |
|---|---|
| • त्यांच्या लग्नात बॅण्ड वाजवला | अवस्था, रात्रिंचर, शास्त्रीय, सार्वजनिक, कर्तव्य, ध्वनिप्रदूषण, स्वच्छ, ग्राहक, दृष्टीने, रस्त्याने, न्यूनगंड, वर्गबंधू, सूर्यनमस्कार, स्वाक्षऱ्या, महत्त्वाचा, व्यक्तींच्या, हस्ताक्षर, उद्योगी, उद्देशून, रसग्रहणासहित, अभिप्राय, |
| • माझ्या दप्तरात वह्या, पुस्तके आणि पेन्सिली आहेत. | व्याघ्रप्रकल्प, बाह्य, पश्चात्ताप, मूर्तिकार, संस्कार, वाऱ्याबरोबर, घडवण्यास, आश्चर्य, - अधोरेखित, शिक्षा, आत्मविश्वास, प्रत्युत्तर, वयोवृद्ध, विद्यार्थिनी, वृक्षदिंडी, पर्यावरण, काबाडकष्ट, वनस्पती, जगदीशचंद्र, विश्रांती, जन्माला, आयुष्य, व्यवहार, सिद्ध, हिंदुस्थानात, मृत्यू, |
| • आम्ही चिक्कू आणि संत्री आणली | सार्थ, उच्चशिक्षण, साहाय्याने, हृदयातील, विद्वानांनी, सर्वत्र, लक्ष्य, व्याख्याने, उक्ती, कीर्ती , पदार्थविज्ञान, स्वस्थपणे, क्रॉसिंग, रॅकेट, कॉलर, आवश्यक, अशक्य, वसतिस्थान, दुःख, स्त्रीलिंग, पुल्लिंग, संशोधन, |
| • सर्वांनी उद्या कार्यक्रमाला या | थट्टा, मुख्याध्यापक, झेब्रा, सर्वांच्या, विद्यार्थिदशा, आंतरिक, गुण |

**तक्ता क्र० २**

स्तर ३

| | |
|---|---|
| श्रुतलेखनासाठी वापरलेले शब्द | चौथीच्या पाठ्यपुस्तकातील सप्टेंबरपर्यंतच्या चाचणीत शब्द-संग्रहातील नमुना शब्द (ज्यावेळी विद्यार्थ्यांची चाचणी घेतली त्या वेळी त्यांना शाळेत अभ्यासक्रमानुसार इतिहास, भूगोल, विज्ञान, या विषयांतील हे शब्द लिहिता येणे अपेक्षित होते.) |
| • कैलासकडे बैल आहे. | स्वराज्य, रायरेश्वर, परिस्थिती, त्यांच्याविरुद्ध, हस्तगत, उच्चारला, कार्य, ध्येयाने, बेचैन, फौजेपुढे, उचंबळून, |
| • पोहायला कोण येणार? | मातोश्रींचे, चित्त, तेजस्वी, घौडदौड, मार्ग, नैर्ऋत्येला, देशोघडीला, पत्करणे, किल्लेदार, लक्ष्मी, दौलताबाद, घृष्णेश्वर, व्यवस्था, पृथ्वी, उष्णता, ग्रह, उपग्रह, |
| • गौरी हौदापाशी खेळायला गेली. | सूर्यमाला, लंबवर्तुळाकार, अर्धा, छायाचित्र, महाराष्ट्र, कृत्रिम, दैनिक, शिलावरण, भूपृष्ठ, व्यापलेला, पॅसिफिक, आर्क्टिक, पृष्ठभाग, शीर्षक, विदर्भ, केंद्रशासित, चौरस, |

| | |
|---|---|
| • नंदाला जांभळ्या रंगाच्या बांगड्या आणल्या | किलोमीटर, क्षेत्रफळ, स्थान, लोकसंख्या, प्रशासकीय, वैशिष्ट्ये, पश्चिम, सह्याद्री, वायव्येस, वनश्री, प्रसिद्ध, कृष्णा, किनारपट्टी, सांस्कृतिक, व्यवसाय, समृद्ध, जिल्ह्यात, समुद्र, क्षार, कार्ये, निर्मिती, विष्ठेवाटे, तंतुमय, बीजप्रसार, वर्गीकरण, अमर्याद. |

मागील स्तरांवरील प्रश्न द्यावा लागला अशा विद्यार्थ्यांची संख्या - स्तर ४, इयत्ता ५वी (असमा - असमाधानकारक व समा - समाधानकारक)

**तक्ता क्र० ३**

| एकूण १९४ विद्यार्थ्यांपैकी | स्तर ४ वर | | स्तर ३ वर | | स्तर २ वर | | स्तर १ वर |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | असमा | समा | असमा | समा | असमा | समा | असमा |
| श्रवण आकलन | ३९ | १७ | २२ | १५ | ७ | ५ | २ |
| निरीक्षण व मौ. अभिव्यक्ती | १८ | १८ | ० | ० | ० | ० | ० |
| वाचन | २६ | ९ | १७ | ४ | १३ | ८ | ५ |
| श्रुतलेखन | ७३ | ७ | ६६ | १६ | ५० | १७ | ३३ |
| स्वतंत्र लेखन | ३४ | ३ | ३१ | ६ | २५ | ६ | १९ |

प्रमाण वा बोली मराठीत श्रुतलेखनात काय अपेक्षित होते? -

| **तक्ता क्र० ४** | **श्रुतलेखनासाठी दिलेल्या वाक्यांचा आशय** |
|---|---|
| स्तर १ इयत्ता २ री | सरळ चल.<br>कपाट उघड.<br>मला नवा डबा हवा.<br>ताई शिडीवर चढली.<br>भाकरी थापली आणि भाजली. |
| स्तर २ इयत्ता ३ री | गूळ घालून खूप लाडू केले.<br>तुझे जुने बूट इथे ठेव.<br>सुनीताला नवे पेन हवे आहे. |
| स्तर ३ इयत्ता ४ थी | कैलासकडे बैल आहे.<br>पोहायला कोण येणार?<br>गौरी हौदापाशी खेळायला गेली.<br>नंदाला जांभळ्या रंगाच्या बांगड्या आणल्या. |

| | |
|---|---|
| स्तर ४ | त्यांच्या लग्नात बँड वाजवला. |
| इयत्ता ५ वी | माझ्या दप्तरात वह्या, पुस्तक आणि पेन्सिली आहेत. |
| | आम्ही चिक्कू आणि संत्री आणली. |
| | सर्वांनी उद्या कार्यक्रमाला या. |

स्वतंत्र लेखनात काय अपेक्षित होते? -

**तक्ता क्र० ५**

| | |
|---|---|
| स्तर १ | खायला काय आवडते याविषयी एक सुसंगत वाक्य. बोलीमध्येही चालेल. |
| स्तर २ | समोर ठेवलेल्या चार वस्तूंचे करणारी चार वाक्ये. बोलीमध्येही चालतील. |
| स्तर ३ | कागदी होडी बनवण्याचे निरीक्षण करून व वर्णन ऐकून चार-पाच वाक्ये. बोलीमध्येही चालतील. |
| स्तर ४ | दोन चित्र पाहून एका वा दोनही चित्रांविषयी चार-पाच वाक्ये बोलीमध्येहीं चालतील. |

वाचनात काय अपेक्षित होते? -

**तक्ता क्र० ६**

| स्तर | अपेक्षा |
|---|---|
| स्तर १ इयत्ता दुसरी | (अ) मुळाक्षरे,<br>(आ) काना, वेलांटी, उकार व एकाराचे शब्द |
| स्तर २ इयत्ता तिसरी | काना, वेलांटी, उकार, एकार, ऐकार, ओकार, औकार व अनुस्वाराचे शब्द |
| स्तर ३ इयत्ता चौथी | १५ जोडाक्षरे |
| स्तर ४ इयत्ता पाचवी | सर्व चिन्हांनी व काही जोडाक्षरांनी युक्त असा दहा वाक्यांचा सोपा परिच्छेद |

■

'कृष्णश्री', 1294, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे 411 002.








# आनंद यादव यांचा बोली-भाषा-विचार

रत्नाकर बापूराव मंचरकर

## पूर्वार्ध

१

आनंद यादव यांचा भाषाविचार हा त्यांच्या ग्रामीण साहित्यसमीक्षेचा एक भाग आहे. त्यांनी ग्रामीण साहित्य चळवळीला घडविले-वाढविले. त्याचप्रमाणे चळवळीनेही त्यांच्यातील लेखकाला नवी जाग आणली. 'सत्यकथे'ने निर्मिलेल्या कलावादी विचारविश्वात व संस्कारात वाढल्यामुळे कलात्मकतेच्या कोषात बंदिस्त होऊन साहित्यनिर्मिती करणाऱ्या यादवांचे लेखन चळवळीमुळे कलात्मकता टिकवून अधिक समाजनिष्ठ झाले आणि त्या प्रमाणात त्याला वाङ्मयीन महत्तेचाही स्पर्श झाला.

आनंद यादव आणि ग्रामीण साहित्याची चळवळ यांच्यामधील द्वंद्वात्मक नात्याचा प्रत्यय त्यांच्या बोलीभाषा विचारातूनही येतो. यादृष्टीने त्यांचे पुढील लेख माझ्यासमोर आहेत :

१. ग्रामीण साहित्याची भाषा

२. ग्रामीण साहित्याच्या भाषेच्या मर्यादा आणि विकासाच्या दिशा
संदर्भ स्वरूप - (१) 'ग्रामीण साहित्य : स्वरूप आणि समस्या'; मेहता पब्लिशिंग हाऊस पुणे, १९७९. 'मराठी साहित्य, समाज आणि संस्कृती'; मेहता पब्लिशिंग हाऊस पुणे, १९९३.

३. ग्रामीण भाषेचा वाङ्मयीन प्रवास

४. साहित्यातील प्रमाणभाषा आणि ग्रामीण भाषा.

संक्षेप : संस्कृती

मुख्यत: हे चार लेख डोळ्यासमोर ठेवून आनंद यादवांच्या बोलीभाषा विचाराची मांडणी व तपासणी येथे केली आहे.

संदर्भ देताना ग्रंथनामाचा संक्षेप, लेखाचा क्रमांक व पृष्ठक्रमांक विवेचनातच कंसात दिले आहेत. त्याशिवाय वेगळे संदर्भ लेखाच्या शेवटी नोंदविले आहेत.

**ग्रामीण साहित्याची भाषा**

इ०स० १९६०-६१ पासून आनंद यादव यांचे ग्रामीण साहित्य 'सत्यकथे'सारख्या सुप्रतिष्ठित मासिकातून प्रसिद्ध होऊ लागले. तेव्हापासून साहित्यातील ग्रामीण भाषेवर वेगवेगळे आक्षेप घेतले जाऊ लागले. 'ग्रामीण बोलीतील साहित्य कळणे वाचकाला अवघड जाते. ग्रामीण साहित्य बोलीतच लिहिले गेले तर त्याचा वाचकवर्ग मर्यादित होईल. त्यामुळे ग्रामीण साहित्य नागर भाषेत लिहिणेच योग्य ठरते. निदान निवेदन नागर व संवाद ग्रामीण ही पद्धती वापरणे अधिक श्रेयस्कर. ग्रामीण साहित्यासाठी ग्रामीण बोली वापरणे जर अपरिहार्य वाटते तर सगळेच ग्रामीण साहित्य बोलीत का लिहिले जात नाही?' असा त्या काळातल्या मान्यवर कथाकारांचा, कवींचा व टीकाकारांचा सूर होता. साहित्यक्षेत्रात नव्याने प्रवेश केलेले यादव अशा प्रश्नांनी गांगरून जात. तरीही आपण जी ग्रामीण बोली वापरत आहेत ती उचित आहे; असे त्यांना मनोमन वाटत असे. त्यातून ग्रामीण साहित्याची भाषा या विषयाच्या विचाराकडे ते वळाले. (स्वरूप ७/पृ० ८४ व ९०-९१ संस्कृती/प्रास्ताविक)

कलामाध्यमाचा प्रश्न हा कलानिर्मितिप्रक्रियेचा भाग असतो. अशी या प्रश्नाची स्थाननिश्चिती त्यांनी आरंभीच केली आहे. त्यानुसार ग्रामीण साहित्याची भाषा ग्रामीण की नागर हा प्रश्न वाचकांनी किंवा टीकाकारांनी सोडवायचा नसून लेखकाने सोडवायचा प्रश्न आहे; अशी भूमिका त्यांनी घेतली. (स्वरूप ७/पृ० ८४) निर्मितिप्रक्रियेच्या अंगाने ते प्रथम लेखकाचा अनुभव आणि भाषा यांचे नाते सांगतात. ग्रामीण जीवनाचा अनुभव घेत असताना ग्रामीण बोलीही त्या अनुभवाचा भाग म्हणून लेखकाला जाणवत असते. त्यामुळे अनुभव व्यक्त करताना त्याला ती भाषा टाळता येत नाही. त्याचप्रमाणे अनुभवावर दुसरी भाषाही चढविता येत नाही. (स्वरूप ७/पृ० ८६)

शास्त्रामध्ये भाषा अर्थव्यक्तीचे साधन असते तर कलेमध्ये ती माध्यमाचे काम करते. कलावंताला अर्थाच्या द्वारे फक्त माहिती द्यायची नसते. त्याला शब्दाचे व्यक्तित्व, सत्त्व, चैतन्य आणि सौंदर्य यांचा अर्थासह वापर करून अनुभवाला व्यक्त करावयाचे असते. 'माझे बोट कापले' आणि 'माझं बॉट कापलं' ही दोन्ही वाक्ये जवळपास सारख्या अर्थाची. पण त्यातून व्यक्त होणारे अनुभव कसे वेगवेगळे असतात आणि ते क्रमाने नागर व ग्रामीण अनुभवांची अनुभूती कशी देतात याचे मार्मिक विवेचन यादवांनी केले आहे. (स्वरूप ७/पृ० ८५-८७)

लेखकाने माध्यमाकडे जाणीवपूर्वक व अभ्यासपूर्वक लक्ष द्यावे लागते त्याप्रमाणे त्याला कथेचा स्वभाव ओळखूनही माध्यम वापरावे लागते. यादृष्टीने निवेदनशील कथा आणि आविष्कारशील कथा असे दोन प्रकार कल्पून भाषा कशी बदलते याविषयीचे विवेचन यादवांनी केले आहे. (स्वरूप ७/पृ० ८८-९७) त्यातील संदिग्धता, परिभाषेची गल्लत आणि परस्परविरोध थोडा बाजूस ठेवून यादवांना अभिप्रेत असलेला अर्थ आपण आधी पाहू.

भाषेद्वारा निवेदन व भाषेद्वारा आविष्कार यांतील फरक ते सांगत आहेत. निवेदनापेक्षा आविष्कारात भाषामाध्यम अधिक सूक्ष्म, बारकाव्याचे, नक्षीचे, उत्कट व सजीव होते. आविष्कार पात्राच्या भाषेतून प्रकट होतो. त्या भाषेला त्या प्रकारच्या पात्राचा, त्याच्या सामाजिकतेचा, त्याच्या संस्कृतीचा, त्या प्रदेशाचा व पात्राच्या भावभावनांचा वैशिष्ट्यपूर्ण संदर्भ असतो. त्यात त्या भाषेचे सत्त्व, त्याचे व्यक्तित्व, त्याचं चैतन्य असते. (स्वरूप ७/पृ० ९१)

काही उदाहरणांनी यादवांनी हा मुद्दा स्पष्ट केला आहे. 'देवा सखा महार' या कथेत व्यंकटेश माडगूळकर उन्हातान्हातून हिंडल्याने देवाची झालेली अवस्था निवेदन करतात. अनुभव साक्षातपणे चित्ररूपाने उभा न करता अनुभव व वाचक यांच्यामध्ये उभे राहून कथा सांगण्याची भूमिका माडगूळकर स्वीकारतात. एक प्रकारचा मानसिक अलिप्तपणा, प्रतिष्ठित वाङ्मयीन भाषेचे संस्कार, आपल्या मध्यमवर्गीय वाचकाला समजले पाहिजे याचे भान यांसारख्या कारणांमुळे माडगूळकरांच्या कथेतील अनुभवाचा भोग व त्याची अभिव्यक्ती यावर मर्यादा पडतात. त्याचा परिणाम म्हणून माडगूळकर ग्रामीण भाषेला नागर रूप देतात आणि त्रयस्थपणे निवेदन करतात. (स्वरूप ७/पृ० ९२-९३).

शंकर पाटीलही 'ऊन' या कथेत उन्हातून चालणाऱ्या रामूचे असेच वर्णन करतात. येथला भाषेचा सगळा बाज ग्रामीण आहे. तथापि नागर वाचकांची सोय पाहण्यासाठी त्यांनी तिच्यावर नागर भाषेचा मामुली रंग दिलेला आहे. त्यामुळे त्यातील ग्रामीण स्पंदन गुदमरत आहे. ग्रामीण भाषेचा नाद, सूर, बद्द वाजत आहे. पाटलांनी येथे अकारण ग्रामीण भाषेच्या स्वभावधर्माला उपरे शहरी सदरे घातले आहेत, असे दिसते. ह्याच उताऱ्याचे ग्रामीण बोलीत पुनर्लेखन केले तर त्यातील ग्रामीणता कशी उठावदार होते व तिचा सूर कसा अस्सल होते, ते यादवांनी दाखवून दिले आहे. (स्वरूप ७/पृ० ९३-९५)

यानंतर आनंद यादवांनी स्वतःच्या 'गाळ' या कथेतील एक ग्रामीण बोलीतील एक उतारा समोर ठेवला आहे. ह्या उताऱ्याचे नागर भाषेत पुनर्लेखन केले तर त्यातील

ग्रामीण कष्टकऱ्याची मनोऽवस्था आणि वातावरणाची लय कशी हरवते; ते त्यांनी दाखवून दिले आहे. ग्रामीण अनुभवाचे असे अनेक सूक्ष्म बारकावे आडमुठेपणाने आणि अट्टहासाने नागर भाषेत लिहिताना नाहीसे होतात. (स्वरूप ७/पृ० ९५-९६). असा आपला अनुभव त्यांनी सांगितला आहे.

वाचकाच्या सोयीसाठी ग्रामीण बोली नाकारणे योग्य नाही. त्याचप्रमाणे सरसकट ग्रामीण बोलीच वापरावी हाही आग्रह नसावा. लेखकाचा प्रतिभाधर्म, साहित्यप्रकाराचे स्वरूप, साहित्यगत अनुभवाचे मागणे हे लक्षात घेऊनच स्वाभाविकपणे भाषेचे माध्यम दक्षतापूर्वक वापरावे; असेच यादवांना अभिप्रेत आहे. ही भाषा केवळ नागर असेल किंवा केवळ ग्रामीण असेल तर कधी ती दोन्हींचे मिश्रण असेल. तिचे स्वरूप हे जे व्यक्त होऊ पाहत आहे त्यावर अवलंबून असते. (स्वरूप ७/पृ० ९६-९७ संस्कृती ५/पृ० ४६-४८) असे त्यांनी म्हटले आहे.

आनंद यादव यांच्या लिखाणाला त्या काळाचा संदर्भ आहे. तो लक्षात घेऊनच ते समजून घ्यावे लागते. तत्कालीन वाङ्मय व्यवहारात लेखक आणि वाचक हे दोन्हीही मोठ्या प्रमाणावर पांढरपेशा वर्गातून आलेले शहरी शिक्षित होते. ग्रामीण साहित्याच्या आकलन-आस्वादनात ग्रामीण जीवनशैलीप्रमाणेच ग्रामीण बोलीचे मर्यादित ज्ञान हा त्यांच्या दृष्टीने एक अडथळा होता. आज हे चित्र बदलले आहे. बोली हीच ज्यांची व्यवहारभाषा आहे असे लेखक-वाचक खेड्याप्रमाणे शहरातही आहेत. आजचा वाचकवर्ग बहुजिनसी आणि बहुघटकात्मक बनला आहे. आज बोलीचा वापर आक्षेपार्ह राहिलेला नाही. त्यामुळे आरंभी ज्या प्रश्नांचा यादवांनी उल्लेख केला आहे ते आज गतार्थ झालेले आहेत. तो संक्रमणकाळ असल्याने त्या वेळी मात्र या आक्षेपांना उत्तरे देण्याची गरज होती.

या प्रश्नांची उत्तरे देताना यादवांनी स्वीकारलेली भूमिका योग्य आहे. वाद टाळून ते समंजसपणे मार्ग काढताना दिसतात. त्यांचे निष्कर्षही योग्य आहेत. उदाहरणे मार्मिक आहेत. भाष्य चांगले आहे. समोर असणाऱ्या साहित्यगत विशिष्ट वास्तवाचा उलगडा करण्याचा प्रयत्न ते करीत आहेत. विगमनात्मक शोधनाचा नमुना म्हणून त्याकडे पाहता येईल. कोणत्याही चर्चेच्या प्रारंभकाला असेच करावे लागते.

यादवांचे मुद्दे बरोबर असले तरी त्यांची मांडणी करताना त्यांनी संज्ञा, संकल्पना, तत्त्वे आणि तथ्ये यांचा गोंधळ केलेला आहे. शास्त्रीय लेखनपद्धतीचा वापर केलेला नाही. त्यामुळे त्यांनी जे युक्तिवाद केले आहेत, विधाने केली आहेत त्यांत काहीसा कच्चेपणा राहिला आहे आणि चुका झाल्या आहेत.



अनुक्रमणिका

त्यांच्या विवेचनात एक संदिग्धता, धूसरता आहे. नेमके पारिभाषिक शब्द ते वापरीत नाहीत. 'भाषाविज्ञान' ऐवजी ते 'भाषाशास्त्र' म्हणतात. 'ग्रामीण बोली' ऐवजी 'ग्रामीण भाषा' म्हणतात. ''वाचकावर भान ठेवणारी.'' (पृ० ८८) अशी सैल शब्दयोजना करतात. कधी कथेला आविष्कारशील म्हणतात तर कधी लेखकाच्या वृत्तीला आविष्कारशील म्हणतात (पृ० ८८). निवेदन, कथन आणि भाषाशैली यांना एक मानून विवेचन करतात. त्यामुळे त्यात अकारण गुंतागुंत निर्माण होते.

'निवदेनशील कथा' आणि 'आविष्कारशील कथा' या शब्दांबाबत ते म्हणतात, ''...मी हे शब्द (दुसरे चांगले शब्द सुचत नाहीत; म्हणून म्हणा पाहिजे तर) वापरत आहे.'' (पृ० ८८) हा खुलासा यादवांचे चाचपडणे दाखवीत आहे.

खरं तर यादवांना येथे कथन (टेलिंग) व दर्शन (शोइंग) यामधील भेद सांगावयाचा आहे. पण तो त्यांनी नेमकेपणाने सांगितलेला नाही. त्यामुळे अकारण वाद, शंका, आक्षेप उत्पन्न होतात.

विशिष्ट प्रदेशाची प्राकृतिक वैशिष्ट्ये, निसर्गाचे वेगळेपण, तेथील लोकांची जीवनशैली, त्यांच्या सामाजिक-सांस्कृतिक परंपरा यांचे प्रतिबिंब त्या त्या ग्रामीण बोलीत उमटलेले असते. याविषयी कोणाचा वाद असत नाही. वाद निर्माण होतो तो त्यातील निवेदनाच्या भाषेविषयी. ''ग्रामीण भाषाच तेवढी खेड्यातील लोकांना कळते आणि नागर वळणाची भाषा कळत नाही, असे म्हणणे, तसेच ग्रामीण भाषा ही त्यांना जवळची वाटते व नागर भाषा परकी वाटते असे महाराष्ट्रातील खेडेगाव माहीत असणारा कोणीही मनुष्य म्हणणार नाही.'' असे ग्रामीण कथेच्या निवेदनासाठी नागर भाषेची तरफदारी करताना गो० मा० पवार यांनी एका परिसंवादात म्हटले होते. पण यादवांचा रोख खेड्यातल्या लोकांना काय व किती कळते यावर नसून शहरी वाचकांना बोली पुरेशा कळाव्या म्हणून नागर व ग्रामीण भाषांची सोयीने सरमिसळ करण्याच्या ग्रामीण लेखकांच्या पद्धतीवर आहे.

शतकानुशतकांच्या साहित्यिक वापरामुळे नागरभाषा जशी अर्थसमृद्ध आणि समर्थ झाली आहे तशी ग्रामीण बोली नाही; असाही मुद्दा पवारांनी अपस्थित केला होता. तो यादवांनाही मान्य होण्यासारखा आहे. तथापि, अशा मुद्यांच्या आधारावर ''...सरसकट ग्रामीण कथेची भाषा ही केवळ ग्रामीण असावी हा यादवांचा आग्रह अनाठायी आहे.'' असा जो शेरा पवारांनी दिला आहे तो अन्यायकारक आहे. असा आग्रह यादवांनी धरलेला नाही. केवळ ग्रामीण, केवळ नागर किंवा दोन्हींचे मिश्रण हे तिन्ही प्रकार कथेच्या गरजेनुसार त्यांनी स्वीकार्य मानले आहेत. (स्वरूप ७ /पृ० ९६-९६, संस्कृती ५/पृ० ४६-४८)

यादवांच्या सैलसर विवेचनशैलीमुळे ग्रामीण कथेचे निवेदन नागर असते आणि तिचा आविष्कार ग्रामीण असतो; अशा तऱ्हेचे उपयुक्त समीकरण तयार होते. निवेदन करणारा लेखक शिक्षित असतो. तृतीयपुरुषी निवेदनाची भाषा ही त्या 'लेखकाची भाषा' (स्वरूप ८/पृ० ९०) असते. त्यामुळे नागर भाषा माध्यम म्हणून अपरिहार्यपणे येते, असे यादव म्हणतात. येथे ते लेखक आणि संहितागत निवेदक त्यांना एकच समजतात. पण ते एक नसून भिन्न असू शकतात, असे ध्यानी घेतले तर निवेदनाची भाषा अपरिहार्यपणे नागर असण्याची गरज राहात नाही.

निवेदनशील कथेपेक्षा आविष्कारशील कथा अधिक चांगली; असा जो सूर यादवांच्या लेखनात आहे तोही तितकासा योग्य नाही. पवार म्हणतात त्याप्रमाणे तृतीयपुरुषी निवेदन कथेमध्ये अजिबात टाळावयाचे व पात्रालाच बोलू द्यायचे; असे लेखन समाजचित्रणाच्या दृष्टीने किरटे होत जाते. पुष्कळ ठिकाणी तृतीयपुरुषी निवेदनाची कलात्मकता अपरिहार्यपणे जाणवते. खरं तर हा मुद्दा कथन आणि दर्शन यांच्या अंगभूत बलाबलाचा आहे. त्याचा निर्णय काहीही झाला तरी दोन्हींचीही कथात्म साहित्यात अपेक्षा व आवश्यकता मान्य करावी लागते. त्यासाठी कथात्मक साहित्यातील निवेदक व निवेदन यांचे स्वरूप स्पष्ट करून घेणे आवश्यक आहे. कथेतील कल्पित विश्वाकडे निवेदक आपल्या विशिष्ट दृष्टीने (पॉइंट ऑफ व्ह्यू) पाहत असतो. हा निवेदक सर्व जाणणारा, सर्व पाहणारा असा सर्वज्ञ सर्वसाक्षी असू शकतो. त्याचप्रमाणे कथागत पात्रांप्रमाणे एक निरीक्षकही असू शकतो. कधी तो त्रयस्थ असतो तर कधी कथागत पात्रही असू शकतो. हा निवेदक कथेचे कथन विशिष्ट भाषेत, विशिष्ट पद्धतीने आणि विशिष्ट शैलीने करीत असतो. याला निवेदकाचा 'आवाज' म्हणतात. निवेदकाची भाषा नागर आहे की ग्रामीण बोली आहे त्याच्या संबंध या 'आवाजा'शी असतो. निवेदन त्रयस्थ आहे की पात्रमुखी आहे याचा संबंध निवेदकाच्या दृष्टिकोणाशी असतो. अशा स्थितीत तृतीय पुरुषी निवेदकाचे निवेदन नागर व पात्रमुखी निवेदकाचे निवेदन ग्रामीण बोली असा नियम स्वीकारता येणार नाही. त्या त्या विशिष्ट कथेवर त अवलंबून असेल.

'दृष्टिकोण' आणि 'आवाज' यांना अनुसरून निवेदकाच्या निवेदनपद्धतीचे स्वरूप ठरत जाते. अनुभव घेण्याच्या व सांगण्याच्या पद्धतीप्रमाणे कथन (नॅरेशन), वर्णन (डिस्क्रिप्शन), संवाद (डायलॉग) आणि भाष्य (कॉमेंटरी) असे निवेदनाचे चार मूलभूत प्रकार अस्तित्वात येतात. त्यांच्या गरजेनुसार केलेल्या वापरातून कथासंहिता घडत जाते.

येथे 'कथन' (टेलिंग) व 'दर्शन' (शोइंग) यातील फरक लक्षात घेता येईल. वर्ण्य पात्र-प्रसंग, भाव-विचार, वातावरण हे सर्व कुणी तरी बघत आहे व आपणास

समजून सांगत आहे अशा पद्धतीने कथन केले जाते. येथे निवेदकाच्या कमीजास्त निरीक्षणाचा व दृष्टिकोणाचा कथनावर परिणाम होत असतो. त्याद्वारे तो वर्ण्य विषयाचे मूल्यही अप्रत्यक्षपणे सुचवीत असतो. वर्ण्यविषय आपणास निवेदकाच्या दृष्टीने समजतो व तो तसाच समजावा असा निवेदकाचा हेतूही असतो. व्यंकटेश माडगूळकरांची कथा अशी कथनपर आहे, हे उघड आहे.

दर्शनात्मक चित्रणात निवेदकाचे नाममात्र अस्तित्व असते. मूर्त कल्पना, संवेदना, हालचालीतील लकबी, संवाद, साधी शब्दकळा व निवडक तपशील यांचा वापर करून जे घडले, जसे घडले ते तो तसेच वाचकांसमोर ठेवीत असतो. अशा दर्शनात्मक चित्रणामुळे वर्ण्य अनुभव अधिक मूर्त, काहीसा इंद्रियगोचर होतो. त्यात एकप्रकारचा जिवंतपणा येतो.

शब्दमाध्यमाच्या मर्यादेत कल्पितविश्व लेखकाने 'सांगणे' आणि 'दाखविणे' यातला हा फरक आहे. वाचकाच्या दृष्टीने 'ऐकणे' आणि 'पाहणे', 'समजणे' आणि 'जाणवणे' यात जो फरक आहे तोच 'कथन' आणि 'दर्शन' यांच्या परिणामातील फरक आहे.

'आविष्कार' या संज्ञेचा वापर करून यादव जे विवेचन करीत आहेत, उदाहरणे देत आहेत त्यावरून ते पात्रमुखी निवेदनाविषयीच बोलत आहेत, असा ग्रह होतो. तथापि यादवांना येथे दर्शनात्मक चित्रण अभिप्रेत आहे, असे मानणे अधिक योग्य आहे.

माडगूळकरांच्या तृतीयपुरुषी निवेदनाची यादवांनी जी मीमांसा केली आहे तीही न पटण्यासारखी आहे. व्यंकटेश माडगूळकरांनी श्री० म० माटे यांची विश्वस्ताची भूमिका जाणीवपूर्वक नव्हे; तर काहीशा गतानुगतिक पद्धतीने स्वीकारली. माडगूळकरांचे तृतीयपुरुषी नागर निवेदन ग्रामीणांपेक्षा वेगळी मूल्ये स्वीकारल्याच्या सुप्त जाणिवेतून निर्माण झाले आहे. (स्वरूप ७/पृ० ८८-९३, संस्कृती ५/पृ० ४३-४५), ही यादवांची कारणमीमांसा न पटणारी आहे. याविषयी अधिक चर्चा करण्यापेक्षा आनंद यादवांचेच एक विधान पुढे करणे पुरेसे होईल. ते असे, ''माट्यांचे विश्व लहान होते तरी ते अत्यंत कसदार आणि सखोल, मानवतेच्या स्पंदनाने जिवंत झालेले होते. म्हणूनच ग्रामीण कथेचे जनक त्यांना मानावे लागते. पुढे व्यंकटेश माडगूळकरांनी हेच अत्यंत मन:पूर्वकतेने, व्यापकतेने, सूक्ष्मतेने, सातत्याने केले.'' (स्वरूप १/पृ०२९) माट्यांच्या कथेपेक्षा माडगूळकरांची कथा अधिक कलात्मक असल्याचा निर्वाळाही यादवांनी तेथेच दिला आहे.

यादवांच्या विवेचनात असे पुष्कळच अधिक-उणे असले तरी साहित्यातील बोलीच्या वापराविषयी त्यांनी जे प्रश्न उपस्थित केले आहेत त्यांना त्यांनी समर्पक उत्तरे दिली आहेत, हे मान्य करावे लागते.

**कलामाध्यम म्हणून बोलीच्या मर्यादा व विकासाच्या दिशा**

बदलते ग्रामीण जीवन आणि त्यामुळे ग्रामीण साहित्यात वाढलेला ग्रामीण बोलींचा वापर हा आनंद यादवांच्या चिंतनाचा विषय आहे. इ० स० १९६५ ते १९७५ या काळात खेड्यातील सामाजिक परिस्थिती सुधारली. शिक्षितांचे प्रमाण वाढले. महाविद्यालये, साखर कारखाने, सहकारी सोसायट्या, ग्रामपंचायती यांत नोकऱ्या मिळाल्याने ग्रामीण समाजाशी या नवशिक्षितांचा संबंध कायम राहिला. पहिल्या पिढीपेक्षा या दुसऱ्या पिढीचा प्रमाणभाषा, नागर साहित्य व संस्कृती यांच्याशी प्रत्यक्ष संपर्क कमी आला. साहजिक त्यांची प्रमाणभाषा, नागर नोकरदारांपेक्षा वेगळी आणि ग्रामीण वळणाची बनली. त्यामुळे या पिढीतील साहित्यिकांनी आपल्या लेखनात ग्रामीण बोलीभाषेचा सहजपणे, मुक्तपणे व स्वाभाविक रीतीने वापर केला. नव्या युगाने ग्रामीण भाषेला दिलेली ही महत्त्वाची आणि अपूर्व देणगी आहे. (स्वरूप ८/ पृ० ९८,१०१,१०४)

अशा वेळी ग्रामीण बोलीभाषेच्या काही मर्यादा लेखक म्हणून जाणवू लागतात. ग्रामीण भाषा ही गावातल्या प्राथमिक पातळीवरच्या साध्यासुध्या जीवनाची भाषा आहे. साहजिकच तरल, जटिल आणि वास्तवापासून काहीशा वेगळ्या अशा जाणिवांचा आविष्कार करताना लेखकाला तिच्या मर्यादा जाणवतात. ग्रामीण कविता असो की आणखी काही त्या लेखनाला उपलब्ध शब्दसंपदेवरच गुजराण करावी लागते. या भाषेला व्याकरण असले तरी व्याकरण, भाषाविज्ञान, व्युत्पत्ती यांच्या आधाराने नवे शब्द घडविता येत नाहीत. शब्द रूढ होऊन वापरला गेला तरच तो 'शैली'चा भाग होतो. एखादा शब्द घडविला तरी त्याला 'बोली'पण प्राप्त झालेले नसल्याने तो वापरणे अनुचित ठरते. नवशब्दनिर्मिती हा नागर लेखनात कौतुकाचा भाग ठरतो. ग्रामीण लेखनात मात्र त्यामुळे अनौचित्य निर्माण होते. रूढ शब्दसामग्रीची मर्यादा ही ग्रामीण साहित्याला स्वीकारावी लागते. (स्वरूप ८/पृ० ९९-१००) साहित्याचे माध्यम म्हणून ग्रामीण बोलीची ही मर्यादा नोंदविण्यात यादवांनी आपल्या भाषिक संवेदनशीलतेचा आणि साहित्यनिर्मितीच्या अनुभवाचा प्रत्यय दिला आहे. त्यांची समीक्षा ही एका 'पोएट-क्रिटिक'ची समीक्षा आहे, हे अशा वेळी ठळक होते.



अनुक्रमणिका

बोलीने प्रमाण भाषेला वेळोवेळी भाषिक खुराक पुरविलेला आहे. आता प्रमाण भाषेने बोलीला असा भाषिक खुराक पुरविला तर ग्रामीण मनाचा आविष्कार साहित्यातून करण्यास साहाय्यच होईल; असा अभिनव विचार त्यांनी मांडला आहे. आजच्या पिढीच्या ग्रामीण बोलीवर नागर भाषेचेही संस्करण आहे. त्यामुळे त्यांच्या साहित्यात नवे शब्द, शब्दप्रयोग, अलंकारांचा वापर, काव्यात्म आविष्कार दिसतो. ग्रामीण जीवनाची पातळी उंचावताना ही नागर संस्कारांनी विकसित झालेली ग्रामीण बोली अधिक साहाय्यक ठरेल असे त्यांना वाटते. यासंबंधात ग्रामीण बोलीत मुरून जातील असेच नागर भाषेतील शब्द, शब्दरूप, शब्दप्रयोग, वाक्यरचना आणणे औचित्याला धरून होईल. त्यांचा अतिरेक झाला तर ग्रामीण बोलीचा पोत आणि कस बिघडण्याची शक्यता आहे, असा इशाराही त्यांनी दिलेला आहे. एकूण ग्रामीण भाषेवर नागर भाषेचे संस्कार सूक्ष्मतः करीत राहणे व त्याद्वारे ग्रामीण बोलीचा माध्यम या नात्याने विकास करणे जोखमीचे काम आहे; असा निर्वाळा त्यांनी दिलेला आहे. त्याचप्रमाणे भाषाविकासाला हातभार लावण्याचे श्रेयही इ० स० १९६५ ते १९७५ या दशकातील ग्रामीण साहित्यिकांना दिले आहे.(स्वरूप ८/पृ० १०१,१०४,१०५)

ग्रामीण बोलीत नवशब्दनिर्मितीची प्रक्रिया घडत नाही, घडविता येत नाही; असे जे यादव म्हणतात ते तपासून पाहावे लागेल. याचा दुसरा अर्थ असा होतो की ग्रामीण बोलीचा कोणताही विकास आजपर्यंत झालेला नाही. भाषेचा स्वभाव लक्षात घेता असे होणे संभाव्य वाटत नाही. ''साहित्यनिर्मितीची गरज म्हणून नवे ग्रामीण शब्द कधी आलेच नाहीत किंवा घडलेही नाहीत... लिखित स्वरूपात ग्रामीण साहित्य ही घटना प्रथमच ग्रामीण भाषेत, देशाच्या सांस्कृतिक इतिहासात घडत आहे.'' (स्वरूप ८/पृ० १०१) ही यादवांची विधाने अनैतिहासिक आहेत. म्हाइंभट्ट, नामदेव, एकनाथ आणि तुकाराम यांसारख्या मध्ययुगीन साहित्यिकांनी ग्रामीण बोलीचे सत्त्व शोषूनच कसदार साहित्यनिर्मिती केली. त्यामुळे शेतारानात राबणाऱ्या निरक्षर कष्टकऱ्यांनी त्यांचे साहित्य सातशे वर्षे आपल्या जिभेवर घोळत ठेवले; हे कसे विसरता येईल?

ग्रामीण बोलीला समृद्ध करण्याचे कार्य यादवांच्या पिढीतील लेखकांनी केले ते माडगूळकरांच्या पिढीने केले नाही (स्वरूप ८/पृ० १०१-१०३, १०४-१०५) असा जो सूर यादवांनी लावला आहे तोही बरोबर नाही. व्यंकटेश माडगूळकरांनी ब्राह्मण-मराठ्यांपासून स्पृश्यास्पृश्यांपर्यंतच्या सगळ्या जातीपातीतील स्त्री-पुरुषांची भाषा संवादासाठी चांगल्या प्रकाराने उपयोगात आणली. त्यांचे नागर निवेदनही बोलीतील मार्मिक शब्दांच्या वापराने ग्रामीणतेला उठाव देते. गो० मा० पवार म्हणतात त्याप्रमाणे,

केवळ साहित्यिक प्रमाण मराठी भाषेचा सराव असणाऱ्या वाचकांना ग्रामीण बोलींचा क्रमशः परिचय करून देऊन प्रमाण साहित्यिक भाषा व ग्रामीण बोली यांच्यामध्ये पूल बांधण्याचे महत्त्वाचे कार्य केले व साहित्यिक भाषेला बोलीकडे उन्मुख केले. हे माडगूळकरांचे श्रेय नाकारता येणारे नाही.

**बोलींचे भवितव्य**

विवेचनाच्या ओघात समकालीन वाङ्मयव्यवहारातील शंका-कुशंका, प्रश्न-आक्षेप यांचाही यादव परामर्श घेतात. भविष्यात खेड्यांचे उपनगरात रूपांतर होईल. ग्रामीण जीवनाबरोबर ग्रामीण बोली नाहीशी होईल. असे झाले तर ग्रामीण साहित्याला व बोलीला काही भवितव्य आहे काय ? - हा एक असाच प्रश्न.

असे होणार नाही; असं एक उत्तर यादवांनी दिलेले आहे. शहरकेंद्री मनोवृत्तीतून उपस्थित केलेला हा प्रश्न त्यांना फसवा वाटतो. शिक्षित माणूस शहरवासी झाल्यावर त्याची ग्रामीण बोली नाहीशी होऊन तो नागर बोलू लागतो; या पहिल्या पिढीच्या अनुभवावर हा प्रश्न आधारलेला आहे. पण आता शिक्षित माणूस ग्रामातच राहतो, म्हणून त्याचा ग्रामवास आणि ग्रामीण बोली कायम राहतील. अर्थात कोणत्याही भाषेप्रमाणे तिच्यात अंतर्गत परिवर्तने होत राहतील.

कितीही सुधारली तरी खेडी कृषिप्रधानच राहतील. परिवर्तने झाली तरी ग्रामीण जीवन म्हणजे नागर जीवनाचा छोटा नमुना असे होणार नाही. आजकालचे काही नष्ट झाले तरी उद्याचे नवे ग्रामीण जीवन, नव्या समजुती, नवी सामाजिक परिस्थिती असेल. त्यातील तणाव नव्या ग्रामीण साहित्यात येतील.

प्रश्नामध्ये अभिप्रेत आहे तसे झाले तरी त्याचा अपेक्षित परिणाम होणार नाही; असे दुसरे उत्तर यादवांनी दिलेले आहे. बदल झाला तरी भविष्यकाळात भूतकालीन बोलींचा नमुना म्हणून ग्रामीण साहित्याकडे एक सांस्कृतिक ठेवा म्हणून पाहिले जाईल. यापुढे जाऊन ते म्हणतात, साहित्यगत जीवन व भाषा यांना वर्तमानात अस्तित्व नसले तरी ते व्यक्त करणाऱ्या साहित्याचे मूल्य कमी होत नाही. पौराणिक, ऐतिहासिक वळणाचे साहित्य, प्राचीन संस्कृत व मध्ययुगीन मराठी साहित्य यासारखी उदाहरणे यादवांच्या सिद्धांताला पुष्टी देणारी आहेत. (स्वरूप ८/पृ० १०६-१०७)

**(उत्तरार्ध पुढील अंकात)**

■

श्रीस्वामीसमर्थ, 19, नंदनवन कॉलनी, कोहिनूर मंगल कार्यालयासमोर,
सावेडी, अहमदनगर 414 003. दूरभाष (0241) 242 3575)

# कन्नडबद्दलही चिंता

विरुपाक्ष कुलकर्णी
शब्दांकन : सीमा भानू

ज्या देशात आपण राहातो तिथली भाषा ही आपली मातृभाषा. भारताच्या बाबतीत आपल्या देशाची भाषा हिंदी असली तरी प्रांतवाद वेगवेगळ्या भाषा असल्याने ज्या प्रांतात राहातो, ज्या गावात, घरात राहातो तिथले आजूबाजूचे लोक ज्या भाषेत बोलतात तीच आपलीही भाषा बनते. ही नुसती एकमेकांशी बोलण्याची सोय नाही. तर या आपल्या भाषेशी आपलं एक वेगळंच नातं असतं. आपण राहातो तिथल्या पद्धती, आजूबाजूचे लोक, साहित्य, करमणुकीची साधनं या सगळ्याशी आपण बांधले जातो ते भाषेमुळेच. भाषेशिवायही हृदयाचा हृदयाशी संवाद होऊ शकतो हे खरे असले तरी रोजच्या व्यवहारात भाषा ही महत्त्वाची असतेच. दूर कुठंतरी परक्या देशात फिरत असताना आपल्या भाषेतला ओळखीचा शब्द कानावर पडला तर किती आनंद होतो याचा अनुभव आपल्यापैकी खूप जणांनी घेतला असेलच.

ग्लोबलायझेशनच्या जमान्यात मात्र इंग्रजी हीच एकमेव संपर्कभाषा बनू पाहातेय. काही प्रमाणात ते अपरिहार्य असले तरी, मातृभाषेची लज्जत तिच्यातून बोलण्याची, लिहिण्याची, (अगदी भांडण्याची सुद्धा!) मजा वेगळीच आहे. त्यामुळेच व्यवहारात आपण कोणतीही भाषा वापरत असलो तरी मातृभाषा जिवंत राहावी यासाठी प्रयत्न होणं ही गरजेचीच गोष्ट आहे. मात्र यासाठी आपल्या भाषेचा अभिमान, तिच्याबद्दल आपुलकी असायला हवी.

आज महाराष्ट्रात मराठी 'वाचवण्या'ची भाषा केली जात आहे. मुळात आपली स्वत:ची भाषा टिकावी यासाठी असे प्रयत्न का करावे लागावेत? तसं प्रत्येकालाच आतून वाटू नये का? अर्थात बऱ्याचशा प्रादेशिक भाषांची हीच स्थिती आहे. कर्नाटकही याला अपवाद नाही. मी मूळचा कर्नाटकाचा. सुमारे ५० वर्षांपूर्वी मी महाराष्ट्रात स्थायिक झालो. त्यामुळे माझ्यासाठी कन्नड आणि मराठी या दोन्ही भाषा मातृभाषाच आहेत. आणि त्यामुळंच त्या टिकवण्यासाठी जो प्रयत्न करावा लागतोय त्याचं वैषम्य वाटल्याशिवाय राहावत नाही.

कन्नड माणसाचं वैशिष्ट्य हे आहे की ते जिथे जातात तिथलेच होऊन जातात.

दुसऱ्या भागात गेल्यावर हा सद्‌गुण ठरतो; पण भाषेच्या दृष्टीनं ते दौर्बल्य आहे. कारण ते स्वत:ची भाषा जगवण्यासाठी फारसे प्रयत्न करत नाहीत. याउलट बेंगळूरूसारखी ठिकाणं आता 'आयटी पार्क' झाल्यामुळे बाहेरगावची मुलं-मुली मोठ्या प्रमाणात इथं येतात ती मुख्यत: इंग्रजीत बोलतात; त्यामुळं आपोआपच रोजच्या व्यवहारातूनही कन्नड भाषा हद्दपार होऊ लागली आहे.

आताच कर्नाटक राज्य ब्रिटिश राजवटीत पाच तुकड्यांत विभागलं गेलं होतं. मैसूर प्रांत, मुंबई प्रांत ज्यात बेळगाव, धारवाड, विजापूर, कारवार होते, मंगळूर वगैरे भाग मद्रास प्रांतात तर गुलबर्गा, रायचूर वगैरे निजामशाहीत होते. नंतर भाषावार प्रांत रचना होऊन या सगळ्यांचे मिळून कर्नाटक राज्य झाले. तरीही त्या वेगवेगळ्या संस्कृतींचा प्रभाव कायम राहिला. महाराष्ट्रात जसे विदर्भ, मराठवाडा, पश्चिम महाराष्ट्र असे वेगवेगळे भाग आहेत, त्यांची सगळ्यांची भाषा एकच मराठी असली तरी बोलण्याची पद्धत वेगवेगळी आहे तसंच हे. उत्तर कर्नाटक, मैसूर, उडपी, अशा तीन लहेजात कन्नड भाषा बोलली जाते. यातही मैसूर भागात कन्नडपेक्षा इंग्रजीचं प्रेम अधिक आहे. तिथली बहुतेक मुलं इंग्रजी माध्यमात शिकतात. त्यामुळे त्यांचं कन्नड इंग्रजीमिश्रित जास्त आहे. आता ग्रामीण भागातही इंग्रजी हवं असं वाटल्यानं बहुतेक भागात पहिलीपासून इंग्रजी सुरू केलं आहे. आता मागणी केली जायला लागली आहे की निदान पाचवीपर्यंत तरी शिक्षण मातृभाषेत व्हावं. कन्नड शाळांतही सध्या कन्नड मूळभाषा म्हणून नाही तर अनेक भाषांतील एक भाषा म्हणून शिकवली जाते.

कन्नड भाषा टिकावी म्हणून कर्नाटकातही प्रयत्न सुरू आहेत. 'कन्नड रक्षणवेदिका' ही संस्था त्यासाठी प्रयत्न करतेय. सरोजिनी महिर्षींनी कन्नडचा वापर कसा करावा याबद्दल अहवाल तयार केला होता. त्यातही सरकारी भाषा कन्नड असावी, फलक कन्नडमध्ये असावेत अशा अनेक गोष्टी सुचविल्या होत्या. पण त्याची अंमलबजावणी अजून म्हणावी तशी झालेली नाही.

कर्नाटकाच्या ग्रामीण भागांत दूरदर्शनमुळे हिंदी भाषा सवयीची आहे. कानडी लोक हिंदी बोलत नाहीत यामागे त्यांचा दुराग्रह आहे, असा एक गैरसमज आहे. प्रत्यक्षात तसं काही नाही. एक तर त्यांचं आकलन कमी आहे. दुसरं म्हणजे भाषा नीट येत नसेल तरी दडपून बोलायचं धाडस त्यांच्यांत नाही. त्यामुळं ते हिंदी फारसे बोलत नाहीत.

कर्नाटकाला चांगल्या साहित्याची परंपरा आहे. स्वातंत्र्यचळवळीत भाग घेणारे, इंग्रजी साहित्याचा अभ्यास करणारे अशा दोन्ही प्रकारचे साहित्यिक इथे आहेत. त्यामुळे त्यात एक प्रकारची समृद्धता आहे. अर्थात महाराष्ट्रात लिखाणातून जसे प्रागतिक

विचार मांडले गेले. तसे त्याबाबतीत मात्र कर्नाटक मागे राहिला. सरकारने वाचनालयांचं जाळं उभारल्यानं पुस्तकांना चांगले दिवस आले होते. आजही काही प्रमाणात वाचनसंस्कृती टिकून आहे. पण पुढच्या पिढीच्या बाबतीत असं म्हणता येईलच असं नाही. त्यांचं शिक्षण इंग्रजीत, त्यामुळं कन्नड साहित्य त्यांना जवळचं वाटत नाही; इंग्रजी साहित्यही ते वाचत नाहीत. त्यामुळं घरात, आजूबाजूला कन्नड वातावरण आणि यांची मानसिकता वेगळी अशा काहीशा सरमिसळ वातावरणात ते वाढताहेत.

महाराष्ट्रात जशा पूर्वी बालगंधर्वांच्या वगैरे नाटक-कंपन्या होत्या तशा उत्तर कर्नाटकात अजूनही आहेत. ग्रामीण अभिरुचीला साजेशी नाटकं त्या सादर करतात. शहरी वर्गात नाटकाचं आकर्षण निर्माण करण्यात गिरीश कार्नाडांचा मोठा वाटा आहे. बी० जयश्रींनी ही लोककला छान जपली. 'लाइव्ह म्यूझिक'सारखे प्रयोग त्यांनी केले. बी० व्ही० कारंथांची 'रंगायन' संस्था ही तर भारतीय नाट्यविश्वातला मानदंडच आहे. याशिवाय नाट्यचळवळ जपण्यात सुब्बण्णा यांचे मोठे योगदान आहे. हेग्गुड गावच्या या कलाकाराने त्यांच्या वडिलांनी स्थापन केलेली 'नीनासम' ही संस्था जपली, नावारूपाला आणली. उत्तम प्रयोग केले. नाट्यशास्त्राचं शिक्षण दिलं. या कामाबद्दल त्यांना मॅगसेसे पुरस्कार मिळाला आहे. यक्षगान हा प्रकारही मूळ कर्नाटकीच. यात एखाद्या पौराणिक प्रसंगावर आधारित नाटक रात्री सुरू करतात, ते सकाळपर्यंत सुरूच असतं. मराठी संगीत नाटक हे 'यक्षगान'वरूनच आलं आहे.

कन्नड चित्रपटानेही व्यावसायिक आणि प्रायोगिकतेचा तोल चांगला सांभाळला आहे. फुटण्णा कनगाल हे यातील प्रमुख नाव. कन्नड सिनेमा राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय पातळीवर नेण्यात गिरीश कासारवल्लींचा मोठा वाटा आहे.

कन्नड साहित्य, नाटके, चित्रपट हे आपल्यापरीने खूपच समृद्ध आहेत. पण इतकं सगळं असूनही मातृभाषेला महत्त्व देणं हे आजकाल कालबाह्य झाल्यानं भाषा टिकणार कशी; ही समस्या निर्माण झाली आहे. ज्यांना या भाषेबद्दल आपुलकी नाही आणि इंग्रजीवरही प्रभुत्व नाही त्यांना कोणतीच संस्कृती न राहिल्याने एक तुटलेपण आले आहे. इंग्रजी शिकण्यात वाईट काहीच नाही; पण त्याचबरोबर मातृभाषेबद्दल जिव्हाळा असणं हेही गरजेचं आहे; हे या मोठ्या वर्गाला समजावून सांगण्याची गरज आहे.

■

1098/11-ब, पार्थ हेरिटेज, मॉडेल कॉलनी, पुणे 411 016
दूरभाष : (020) 2565 9063
ई-38, वुडलँड, कमिन्सच्या मागे, कोथरूड, पुणे 411 038
भ्रमणभाष : 98909 27385

# छंदोगत लयविचार : डॉ० माधवराव पटवर्धन व डॉ० अमूल्यधन मुखर्जी

शुभांगी पातुरकर

डॉ० अमूल्यधन मुखर्जी यांनी लिहिलेल्या 'संस्कृतमधील छंदांचा एक नवीन दृष्टिकोणातून अभ्यास' या लेखातून त्यांचे मराठी 'छंदोरचना'कार डॉ० माधवराव पटवर्धन यांच्याशी असलेले काही मुद्द्यांबाबतचे विचारसाम्य आपण माझ्या 'छंदोरचनेच्या भाषांतराची निकड' या मागील लेखातून (दिवाळी २००८) पाहिले. प्रस्तुत लेखातून छंदोगत लयीविषयीचे हेच सूत्र अधिक विचारार्थ पुढे चालवीत आहे.

आपल्या 'छंदोरचने'तून डॉ० पटवर्धन यांनी शास्त्रीय बैठकीवरून छंदांच्या मूलतत्त्वाचा व्यापक आणि सर्वगामी विचार केला. असे करताना त्यांनी आधुनिक स्वरूपाच्या समकालीन कवितेतील विविध छांदस आविष्कारांचे स्वरूपही लक्षात घेतले. त्यामुळे छंदोविचार हे ऐतिहासिक, गतकालीन, आणि केवळ विद्वानांपुरतेच मर्यादित असे अभ्यासक्षेत्र न राहता, त्याला वर्तमानाचा जिवंत संदर्भ प्राप्त झाला. छंद:शास्त्राच्या प्रगतीच्या दृष्टीने ही बाब फार महत्त्वाची व अर्थपूर्ण होती. मुळात 'पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना' हा महत्त्वाचा सिद्धांत मांडून तो त्यांनी त्रिविध पद्धतीच्या काव्यरचनेला लावून दाखविला. लयसिद्धांत हा समग्र काव्यक्षेत्राला लागू होत असल्यामुळे विभिन्न भाषांमधील काव्यालाही तो लागू आहेच. मुळात अनेक भारतीय भाषांचे मूळ संस्कृत असल्यामुळे संस्कृतातील अक्षरगणवृत्ते व जातिरचना त्या त्या भाषांमध्ये आजही अस्तित्वात आहेत. तेव्हा डॉ० पटवर्धन यांच्या या सिद्धांताची दखल भारतातील अन्य भाषिक छंद शास्त्रकारांनी घ्यायला हवी होती. ती तशी घेतलेली नाही हेच डॉ० अमूल्यधन मुखर्जी यांच्या प्रस्तुत लेखावरून निदर्शनास येते. भाषांतराअभावी मराठी भाषेतील हे धन बंगाली भाषकांपर्यंत पोचले नसावे असाही एक तर्क याबाबत मागील लेखातून नोंदविला होता.

डॉ० माधवराव पटवर्धन व डॉ० अमूल्यधन मुखर्जी या भिन्न कालीन व भिन्न भाषिक छंदशास्त्रज्ञांचे त्यांच्या आधी होऊन गेलेल्या छंदशास्त्रज्ञांविषयीच्या आक्षेपांचे स्वरूप सारखे आहे ही बाब प्रशंसनीय आहे; दोघांच्याही मर्मदृष्टीचे ते निदर्शक -

आहे. मात्र डॉ० माधवराव पटवर्धनांनी या आक्षेपांचे निराकरण करणारा लयबद्धतेचा सिद्धांत मांडला. त्यामुळे छंद:शास्त्राला आलेली कुंठित अवस्था संपून त्याच्या प्रगतीचा मार्ग खुला झाला. छंद:शास्त्राच्या अभ्यासाला ही बाब उपकारक ठरली. डॉ० मुखर्जी देखील छंदातील लयीपर्यंत पोहोचले आहेत. मात्र आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या डॉ० पटवर्धनांच्या या कामगिरीची दखल त्यांनी घेतलेली नाही. त्यामुळे ज्या आक्षेपांचे निराकरण आधीच झालेले आहे तेच आक्षेप त्यांनी नोंदविलेले आहेत. या आक्षेपांचे व त्यांच्या निराकरणाचे सविस्तर स्वरूप पुढीलप्रमाणे आहे :

डॉ० अमूल्यधन मुखर्जी म्हणतात, (१) संस्कृत काव्यातून योजिलेल्या छंदांचे शास्त्रीय अथवा पद्धतशीर रीतीने विवेचन करण्याच्या दिशेने फारच थोडी प्रगती झाली. (२) पूर्वीच्या छंद:शास्त्रकारांनी छंदांच्या लयविषयक अंगाविषयी काहीच विचार केला नाही. (३) छंदांच्या लयतत्त्वमूलक वैशिष्ट्यांवर आधारलेले योग्य असे वर्गीकरण होऊ शकले नाही. (४) अत्यंत भिन्न अशा लयतत्त्वविषयक वैशिष्ट्यांनी युक्त अशी वृत्ते एका गटात घुसडली गेली. (५) उलट एकाच गटात मोडणाऱ्या वृत्तप्रकारांमध्ये असणारे साम्य क्वचितच ओळखले गेले. (६) वृत्ताच्या बांधणीचा मागे यति आणि लयबद्धता यांचा काही परस्परसंबंध आहे, या गोष्टीचा छडा लावला गेला नाही. आणि (७) सांप्रदायिक शास्त्रकारांना पद्यचरणाच्या अत्यंत साध्या नमुन्यामध्ये उघड उघड दिसणाऱ्या लयबद्धतेच्या वैशिष्ट्यांचे देखील आकलन झाले नाही.

डॉ० माधवराव पटवर्धन यांनी आपल्या 'छंदोरचने' (१९३७) मधील 'वृत्तविचार आणि वृत्तविस्तार' या तिसऱ्या अध्यायात जे विवेचन केले आहे त्याद्वारा या सगळ्या मुद्द्यांचे निराकरण आपोआपच होऊन गेले आहे, असे लक्षात येईल.

डॉ० माधवराव पटवर्धन म्हणतात, ''ज्या पद्यातील चरण विशिष्ट अक्षरसंख्या, लगक्रम आणि मोडणी वा गणविभागणी यांनी नियमित असतात ते वृत्त होय. मोडणी म्हणजे पिंगलोक्त गणांचा क्रम नव्हे; तर अंतर्गत आंदोलनानुसार होणारी गणविभागणी होय. अक्षरसंख्या आणि लगक्रम ही अभिन्न असली म्हणजे आरंभापासून गणना करून चरणाचे जे त्र्यक्षरी तुकडे वा गण पडतात ते पिंगलोक्त गण एका ठरावीक क्रमानेच येतात. पण पिंगलोक्त गणांचा क्रम अभिन्न असूनही अंतर्गत आंदोलनानुसार होणारी गण-विभागणी भिन्न-भिन्न होऊ शकते. या गणविभागणीस मोडणी म्हटले आहे.'' (पृ० ९०)

यानंतर त्यांनी 'मणिगुणकर', 'शशिकला' व 'स्त्रक' या तीन वृत्तांचे उदाहरण देऊन आपला मुद्दा स्पष्ट केला आहे. त्याबाबत पुढे ते म्हणतात, ''ही तीन वृत्ते अक्षरसंख्येने आणि लगक्रमाने एकसारखी असल्याने न,न,न,न,स याच क्रमाने तिन्ही

वृत्तांचे पिंगलोक्त गण पडतात; पण या तीन वृत्तांत अनुक्रमे अष्टमात्रक, सप्तमात्रक, षण्मात्रक आवर्तने असल्याकारणाने त्यांची गणविभागणी निरनिराळी होते.''

पुढे यतिमुळे, वृत्ताची लयबद्धता कशी निश्चित होते ते सांगताना ते म्हणतात, ''आवर्तन किती मात्रांचे आहे, आवर्तनारंभ कितव्या अक्षरावर होतो, आणि गणविभागणी कशी होते याचा निर्णय करायला प्राचीन छंद:शास्त्रकारांनी सांगितलेल्या यतिस्थानांचा फार उपयोग होतो. म्हणून लक्षण सांगताना यति कोठे आहे हे सांगण्यात येते; आणि यतिभेदाने म्हणजेच मोडणीभेदाने वृत्तभेद मानण्यात येतो. वर दिलेल्या वृत्तात यति अनुक्रमे ८व्या, ७व्या आणि ६व्या अक्षरानंतर सांगितले आहेत. त्यावरून आवर्तने ही अनुक्रमे अष्टमात्रक, सप्तमात्रक आणि षण्मात्रक आहेत ही गोष्ट कळते.'' (पृ० ९१)

याप्रमाणे अंतर्गत लयीनुसार वृत्तविभागणी करून त्यांनी अनावर्तनी व आवर्तनी वृत्ते सोदाहरण चर्चिली आहेत. आवर्तनी वृत्तांतील पद्मावर्तनी, अग्न्यावर्तनी, भृंगावर्तनी व हरावर्तनी वृत्तांचा तसेच अर्धसमवृत्ते व विषमवृत्ते यांचीही उदाहरणे देत नवी मांडणी केली आहे. याशिवाय वृत्तांच्या नावात माजलेला गोंधळही दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. रूढ झालेल्या वृत्तांपासून नवीन वृत्ते निर्माण करण्याच्या विभिन्न पद्धतींचीही सौदाहरण दखल त्यांनी घेतलेली आहे. विस्तारभेदाने सिद्ध झालेल्या आणि पूर्वापार चालत आलेल्या वृत्तसागरातील वृत्तांची लयदृष्ट्या विभागणी तसेच नामनिश्चिती करून त्यांची नवी व्यवस्था लावण्याची अपूर्व कामगिरी त्यांनी केली. या त्यांच्या ऐतिहासिक योगदानाची दखल इतर भाषिक छंद:शास्त्रज्ञांनी देखील घ्यायला हवी. ■

11/बी - 21, सरकारी वसाहत, हाजी अली, मुंबई 400 034.
भ्रमणभाष : 98703 11534

**लेखकांसाठी सूचना**

१. लेखकांनी पुढील पथ्ये पाळावीत :
   (अ) कागदाच्या एकाच बाजूस, सुवाच्य लिहावे.
   (आ) लेखनाच्या पाकिटावर पुरेशी टपाल-तिकिटे लावावी.
   (इ) लेखाच्या अखेरीस स्वत:ची ओळख (शिक्षण, व्यवसाय, लेखन इ०) थोडक्यात लिहावी. त्याचप्रमाणे स्वत:चा पत्ता व (इष्ट वाटल्यास)दूरध्वनी क्रमांक द्यावा. (संपादकांच्या सोयीसाठी दूरध्वनी क्रमांक जरूर कळवावा.) नापसंत लेखन परत पाहिजे असल्यास पुरेसे टपालहशील पाठवावे.
   (उ) लेखात इंग्रजी अवतरणांचे मराठी भाषांतर द्यावे. व्यक्तिनामे, ग्रंथांची व लेखांची शीर्षके इ० देवनागरीत लिहावी. (अतिशय अपरिहार्य अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा.)

# हिंदी भाषा-क्षेत्रात मराठीचे अध्यापन : समस्या व समाधान

**प्रमोद पडवळ**

गेली सात वर्षे उत्तर भारतात मराठी विषयाचे अध्यापन करत असताना आलेले अनुभव हा या लेखाचा विषय आहे. हिमाचल प्रदेश आणि उत्तर प्रदेश या दोन राज्यांतील शिक्षण-संस्थांतून स्थानिक विद्यार्थ्यांना मराठीचे अध्यापन करत असताना वेगवेगळे अनुभव आले. सहावी ते एम०ए०पर्यंतच्या विद्यार्थ्यांना मराठी भाषा व मराठी साहित्याचे अध्यापन करणे हा माझ्यासाठी खूपच वेगळा अनुभव होता आणि आहे.

कोणत्याही नवीन भाषेचे ज्ञान प्राप्त करणे ही मोठी जटिल प्रक्रिया आहे. परंतु हिंदी भाषिक विद्यार्थ्यांना मराठी शिकविणे तसे काहीसे सोपे आहे. त्याचे कारण म्हणजे हिंदी आणि मराठी या उभय भाषांची जननी संस्कृत आहे. कित्येक असे शब्द आहेत की जे दोनही भाषांत समान आहेत. उदा० घर, कान, नाक, हवा, महात्मा, इ० अर्थात काही शब्द असे आहेत की जे पूर्णतः वेगळे आहेत. उदा० नवरा, बायको, झाड, कोंबडा, कोंबडी, मंजूळ, इ० काही शब्द लेखनात एकसमान आहेत, मात्र त्यांचे अर्थ भिन्न आहेत. उदा० चेष्टा. या शब्दाचा मराठी अर्थ थट्टा, मस्करी असा होतो तर हिंदीत प्रयत्न, यत्न असा होतो.

वर्णमालेचा विचार करत असताना प्रामुख्याने जाणवते ते म्हणजे दोन्ही भाषांतील वर्णमाला एक अपवाद वगळता एकसमान आहे. दोन्ही भाषांची लिपी एकच म्हणजे देवनागरी आहे. 'ळ' हा वर्ण हिंदीत नाही. हा वर्ण प्राकृतमधून आल्याकारणाने आणि संस्कृतमध्ये याचे अस्तित्व नसल्याने उच्चारण्यास कठीण जातो.

कित्येक विद्यार्थ्यांची अवस्था या वर्णाच्या संदर्भात मोठी संभ्रमाची दिसून येते. हिंदीतील 'ल' वर्णाचा पर्याय मराठी 'ळ' वर्ण आहे, अशी बऱ्याच जणांची समजूत आहे. मराठीत 'ळ' आणि 'ल' हे दोन स्वतंत्र वर्ण आहेत हे त्यांच्या मनावर बिंबवावे लागते. 'ळ'चा योग्य उच्चार करून घेण्यासाठी खूप सराव करून घ्यावा लागतो. कित्येक विद्यार्थी 'ळ'चा उच्चार 'ड'सारखा करतात.

मराठीत 'ज'चा उच्चार दोन पद्धतींनी म्हणजे 'ज' आणि 'ज्य' केला जातो.

हिंदीतही या दोन पद्धती आहेत. मात्र त्यांची लेखनपद्धती भिन्न आहे. उदा० जलना, जगत, जतलाना आणि ज़मीन, ज़रा इ० वर्णांखाली नुक्ता लावल्यामुळे समजते की उच्चारण भिन्न आहे. मराठीत असे नाही. त्यामुळे हिंदी भाषक विद्यार्थी या ठिकाणी गडबड करतात. 'च' व 'झ' च्या संदर्भातही हेच म्हणावेसे वाटते. विद्यार्थी 'चांगला' शब्दाचा उच्चार 'च्यांगला' असाच करतात.

'क्ष' आणि 'ज्ञ' या संयुक्त वर्णांच्या उच्चारातही मराठी व हिंदीत अंतर आहे. हिंदीत 'ज्ञ'चा उच्चार 'ग्य' असा करतात. जसे ग्यान, आग्या, प्रग्या इ० 'ज्ञ'चा द् + न् + य् असा उच्चार करणे हिंदी भाषिकांना मोठे अवघड जाते. 'क्ष'चा उच्चार 'छ' असा करतात. संसार, संस्कृत, संस्था इ० शब्दांचे उच्चारण विद्यार्थी पकडू शकत नाहीत.

विरामचिन्हांच्या बाबतीत दोन्ही भाषांत फारसे अंतर नाही. पूर्णविराम मात्र भिन्न आहेत. प्रश्नपत्रिकेतील भाषांतराचा प्रश्न सोडवत असताना पूर्णविराम देताना विद्यार्थी हमखास चूक करतात. मराठीत भाषांतर करताना हिंदीतील उभी रेष देतात.

मराठी शब्दाच्या शेवटी येणारा इ-कार किंवा उ-कार उच्चारानुसार बऱ्याचदा दीर्घ लिहिला जातो. काही तुरळक अपवाद सोडता अन्त्य इ-कार, उ-कार दीर्घ लिहिण्याची पद्धत मराठीत रूढ आहे. हिंदीत याच्या अगदी उलट आहे.

उदा० मराठी शब्द - कवी, साधू, वधू, वायू, हरी इ०

हिंदी शब्द - कवि, साधु, वधु, वायु, हरि इ०

हिंदीत बहुतांशी अन्त्य इ-कार व उ-कार (ऱ्हस्वच) लिहिले जातात. हिमाचल प्रदेशातील नवोदय विद्यालयातील विद्यार्थी मराठी-हिंदी लेखनात वरील शब्दांच्याबाबत हमखास चुका करीत. हिंदी 'कवि' असा लिहिण्याऐवजी 'कवी' असा लिहीत तर मराठीत 'कवी' असा लिहिण्याऐवजी 'कवि' असा लिहीत. परिणामी दोन्हीकडे चूक होत असे. कित्येकदा हिंदीच्या शिक्षकांकडून, 'आपने हमारे बच्चों का शुद्धलेखन बिगाडा है ।' असे ऐकावे लागत असे.

मराठी-हिंदी, हिंदी-मराठी भाषांतर करताना विद्यार्थ्यांना अनेक समस्यांना सामोरे जाताना मी पाहिले आहे. विशेषत: लिंगाच्या संदर्भात अनेकदा घोटाळे होऊन चुका होतात. काही अशी नामे आहेत की जी हिंदी व मराठीत वेगवेगळ्या लिंगात समाविष्ट केलेली आहेत. हिंदीत नामांना पुल्लिंग आणि स्त्रीलिंग अशा दोनच विभागात विभागले जाते. संस्कृत, मराठी व गुजरातीमध्ये नपुसकलिंगामध्येही काही नामे येतात. हिंदीत 'पुस्तक' नाम स्त्रीलिंगी तर मराठीत नपुसकलिंगी मानले जाते. 'घर' मराठीत नपुसकलिंगी तर हिंदीत पुल्लिंगी आहे. हिंदीत 'मिठाई' शब्द स्त्रीलिंगी तर त्याचेच

मराठीतील ‘खाऊ’ हे रूप पुल्लिंगी आहे. अशाप्रकारच्या लिंगपरिवर्तनामुळे भाषांतरात अडथळे येतात. तो (पु०), ती (स्त्री०) ते (नपु०) या सर्वनामासाठी हिंदीत केवळ ‘वह’ या एकाच सर्वनामाचा प्रयोग केला जातो. अशावेळी मराठीतून हिंदीत भाषांतर करताना प्रस्तुत नाम कोणत्या लिंगात आहे हे माहीत असणे अत्यंत आवश्यक असते.

अशाप्रकारे आणखीही मुद्यांवर चर्चा होऊ शकते. यावर हिंदी-मराठीतील तज्ज्ञांनी एकत्र येऊन चर्चा करण्याची आवश्यकता आहे. ■

अधिव्याख्याता, मराठी विभाग, काशी हिंदू विश्वविद्यालय, वाराणसी - 221 005

## चुकीची दुरुस्ती

वर्ष २७ : अंक १, हिवाळा २००९

पुढील चुका/मुद्रणदोष कृपया सुधारून घ्याव्यात :

| पृष्ठ | ओळ | चूक | बरोबर |
|---|---|---|---|
| १ | खालून २ | कविता | कवितेचे अवतरण |
| ५ | वरून ३ | संस्कृतिलक्षी | संस्कृतिलक्ष्यी |
| १३ | वरून १५ | 95240-2336606 | (0240) 233 6606<br>99233 90614 |
| १५ | वरून ९ | कुलकर्णी | कलबुर्गी |
| १८ | खालून ९ | विभक्तांचे | विभक्तींचे |
| १९ | खालून ४ | अजुर्नवाडकरांनी | अर्जुनवाडकरांनी |
| १९ | खालून ७ | सततचा | सततच्या |
| २० | वरून २ | अर्थमुक्त | अर्थमुक्त |
| | वरून ७ | स्मृतिमरूप | स्मृतिरूप |
| २१ | वरून १ (दुसरा शब्द) | पाखरान्हे | पाखराल्हे |
| २६ | खालून ६ | वुट फगाँग | वुल्फगाँग |
| | खालून ११ | आयएन्ए | आरएनए |
| २९ | वरून १३ | मूळ | मूल |
| | वरून १६ | (कुनिंग) | कूइंग |
| ३० | खालून ११ | (इन्फायटील आयुस्टीम) | (इन्फन्टाइल ऑटिझम) |
| ३१ | खालून ३ | अर्ध | अर्थ |
| | खालून १३ | अपसामान्यत: | अपसामान्यता |

# मुलांचा भाषाविकास : डायरीतले एक पान
## १२ मे १९७०

प्र० ना० परांजपे

शिवजयंतीच्या (७ मे) दिवशी परागने दशावतारी नाटक पाहिले. दुसरे दिवशी त्याला त्याविषयी लिहायला सांगितले. ते असे : ''मी काल नाटक पाहिले. ते छान होते. कृष्णाने शंखासुराला गदेने ठार मारले. नारद गात होते.'' वाक्ये सांगताना त्याला मी प्रथम ''ते छान आहे.'' असे सांगितले. पण त्याने मला अडवून विचारलं : ''आहे' कसं? 'होते' पाहिजे. 'काल पाहिले' म्हणजे 'होते' असेच म्हणायला पाहिजे!'' त्याला 'कृष्णाने' लिहिता येईना म्हणून मी त्याला 'देवाने' असे लिहायला सांगितले. पण तो म्हणाला, '' 'देवाने' म्हणजे 'आकाशातल्या देवाने' असे होईल, कृष्णाने नव्हे!'' मग मी कृष्णाचे दुसरे नाव लिही असे म्हटले, तेव्हा त्याला 'अरे कृष्णा, अरे कान्हा' हे गाणे आठवले. पण 'कान्ह्याने' हेही लिहिता येईना. मी त्याला 'मोहनने' लिहायला सांगितले. पण त्याचे म्हणणे असे की ''मोहनने' म्हणजे 'रस्त्यातल्या मोहनने' असे होईल, 'कृष्णाने' नव्हे!'' शेवटी त्याला 'कृष्णाने' हे कसे लिहायचे हे सांगावे लागले. त्यानंतर मी त्याला नुसते 'मारले' असे सांगितले होते. पण '' 'नुस्ते मारले' नाही काही, ठार मारले.'' असे त्याचे म्हणणे. तसे लिही म्हटल्यावर ''गदेने मारले'' असे म्हणून त्याने कृष्ण-शंखासुराच्या लढाईचे वर्णन केले. मग म्हणाला की ''गदेने ठार नाही मारले. गदेने त्याच्या हातातली तरवार उडवून दिली आणि मग बुक्के मारून ठार मारले.'' त्याच्या चिकित्सकपणाला वैतागून मी त्याला 'गदेने' लिहायला सांगितले व त्याचा अभ्यास करून घेणे तिथेच थांबवले.

इतक्या लहान वयात (येत्या पंचवीस तारखेला त्याला पाच वर्षे पूर्ण होतील.) त्याला इतके भाषाज्ञान कसे? तो लेखक - टीकाकार होणार आहे की काय?

■

सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007.
दूरभाष : (020) 2567 4617
ई-मेल : pranaparanjpe@gmail.com

# मानवी हक्कांची भाषा

असीम सरोदे

विविध व्यवस्थांमधील अधिकारी वापरत असलेली व बोलत असलेली भाषा बघितली, की साधारणत: त्या व्यवस्थेच्या दर्जाची कल्पना येते. प्रत्येक व्यवस्थांतर्गत वापरात असलेल्या भाषेवरून त्या व्यवस्थेचा दृष्टिकोणही लक्षात येतो.

कोणत्याच न्यायालयात न्यायाधीशांना उद्देशून लॉर्डशिप, मिलॉर्ड, युवर ऑनर इत्यादी संबोधने वापरण्याची गरज नसल्याचे सर्वोच्च न्यायालयाने स्पष्ट केले आहे. लॉर्डशिप हा शब्द गुलामगिरीशी संबंधित आहे. तथापि, त्या शब्दांमधून न्यायालयाबद्दल आदर व्यक्त होतो, असा चुकीचा समज आढळतो. अंगवळणी पडलेली सवय म्हणूनही अशा भाषेचा वापर होत असावा. 'पुरसिस' हा असाच एक शब्द. त्याचा अर्थ कोणत्याही विनंतीशिवाय न्यायालयाला अगदी थोडक्यात सादर करण्याची माहिती असा होऊ शकतो; पण कोणत्याच शब्दकोशात हा शब्द व शब्दाचा अर्थ सापडत नाही. 'पुसाईन जजेस' हा एक शब्द उच्च व सर्वोच्च न्यायालयाच्या याचिकांमध्ये वापरतात. हा शेक्सपिअरच्या काळातील शब्द आता भारताशिवाय इत्तरत कुणी वापरत नसतील. मुख्य न्यायाधीश व त्यांच्या सोबतचे इतर न्यायाधीश असा सरळ उल्लेख इंग्रजीमध्येही करता येणे शक्य असताना केवळ हा वरील शब्द नाही, म्हणून याचिका योग्य स्वरूपात नाही, असे सांगणारे महाभाग न्यायालयीन कर्मचारीपण आहेत. आम्ही यांत्रिक भाषेच्या एवढे आहारी गेलो असल्यानेच न्यायालय म्हणजे 'न्यायदान' केंद्र असल्याचा बुरसटलेला विचार मानतो. न्यायालये म्हणजे लोकांसाठी अधिकार मागण्याचे ठिकाण आहे व न्याय 'दान' म्हणून नाही, तर 'हक्क' म्हणून प्रत्येकाला मिळाला पाहिजे; हा घटनात्मक अधिकाराचा भाग आहे. त्यामुळे भाषेचा फुलोरा न वापरता आजच्या युगातील भाषा वापरूनही न्यायालयांबद्दल आदर व्यक्त करता येतो. खरे तर आदर केवळ शब्दांमधून नाही, तर चेहऱ्यावरील हावभाव व एकूणच देहबोलीतून व्यक्त होत असतो. मानवी हक्क-संरक्षणाची भाषा समजून घेणे व प्रत्यक्ष वापरात आणण्यातूनही खूप मोठे बदल घडून येऊ शकतात.

सरकारतर्फे ज्या बंदिस्त व्यवस्था चालविण्यात येतात तेथील लोकांची भाषा हा

तर संशाधेनाचा वेगळा विषय होऊ शकेल. बाल अनुरक्षणगृह, भिक्षेकरी स्वीकार केंद्र, मनोरुग्णालय, सरकारी दवाखाने, स्त्रियांसाठीचे आधारगृह, कारागृह येथील अधिकारी अनेकदा असंतुलित पद्धतीने बोलतात. सतत इतरांना रागविणे, चिडचिड करणे, शिव्यांचा स्वैर वापर करीत बोलणे, असेच आवश्यक असते; त्यामुळे वचक राहातो, अशा भ्रमात हे लोक वावरत असतात. पोलीस चौक्यांमध्ये तर शिव्यांचा व अर्वाच्य भाषेचा सुळसुळाट असतो. कडक व वाईट भाषा वापरूनही जेव्हा काम होत नाही असे दिसते तेव्हा त्यांच्या जिभेवरील विष लगेच शरीरात भिनते व पोलीस हिंसक वागतात. आपल्या अवतीभवती असलेल्या जिवंत माणसांशी कधीच माणूस म्हणून वागायचे नाही, म्हणजेच आपण कडक व शिस्तप्रिय अधिकारी ठरू, असे समजणाऱ्यांची भाषा बदलण्याची गरज आहे.

खऱ्या अर्थाने न्याय करण्यासाठी किंवा लोकांचे प्रश्न समजून घेण्यासाठी आम्हांला मानवी हक्कांची भाषा शिकावी लागेल. लिंगभाव म्हणजे जेंडर आणि पुरुषप्रधानता समजून न घेता आम्हाला स्त्रियांचे प्रश्न कसे समजतील ? म्हणून विविधता, विषमता, पितृसत्ता, पुनरुत्पादकता, लैंगिकता, श्रममूल्य, उपभोगाची वस्तू, लिंगभेद विषमता, अधिकारांचे वाटप हे शब्द महत्त्वाचे ठरतात. मग जात, वर्ग किंवा लिंगभावाचा निर्णयस्वातंत्र्यावर होणारा परिणाम आम्ही समजून घेऊ शकतो. मक्तेदारी, अतिरेकी, आंतरधर्मीय, मूलतत्त्ववाद, हिंसकपणा, क्रूरता, असमतोल या शब्दांचे अर्थ शोधताना आम्हांला धार्मिक तेढ व मूलतत्त्ववाद समजू शकतो. भेदभाव व असमानता सतत कायम राहिली, की सुरू होणारे हिंसाचक्र आमच्या दृष्टीस पडले, की लोक हिंसक का बनतात याचाही उलगडा होऊ शकतो.

१६ नोव्हेंबर हा दिवस 'जागतिक सहनशीलता दिवस' म्हणून साजरा करण्यात येतो. वाईटात वाईट बघण्यासाठी आपली सहनशीलता वाढवून भावनांच्या आहारी न जाता विचार करण्याची क्षमता देण्यासाठीही मानवी हक्कांची भाषा व त्या संकल्पनेतील शब्द उपकारक ठरतात. महात्मा गांधींनी सांगितलेली अहिंसक संवादपद्धती याच शब्दांद्वारे प्रत्यक्ष वापरात आणून हिंसा, अतिरेकी कारवाया, गळेकापू व रक्तपिपासू राजकारणाच्या अंधारयुगातून वाट शोधावी लागेल. ■

'दै० सकाळ', पुणे ११.१२.२००८







अनुक्रमणिका

# रसरशीत प्रेमकविता

नीलिमा गुंडी

[परीक्षित पुस्तके : 'निरंतर' - उषा मेहता, ग्रंथाली, पृष्ठे १७१. किंमत २०० रु० 'मितवा' - उषा मेहता, ग्रंथाली, पृष्ठे ४४. किंमत ५० रु०]

उषा मेहता यांच्या 'आभास' (१९८३), 'अप्रूप' (१९९८) आणि 'अन्वय' (२००५) या संग्रहांतील काही निवडक कविता तसेच त्यांच्या काही अप्रकाशित कविता 'निरंतर' या संग्रहात एकत्रित केल्या आहेत. यात ४ विभागांमध्ये १३८ कविता समाविष्ट आहेत. सुरुवातीला डॉ० विजया राजाध्यक्ष यांची रसास्वादपर दीर्घ प्रस्तावना असल्यामुळे वाचकांना कवितेचे मर्म कळण्यास तिची मदत होईल.

'निरंतर' हे शीर्षक या संग्रहाला एका सूत्रात ओवते. व्यापक स्वरूपातील जीवनासक्ती - (प्रेम हेही त्याचेच एक रूप!) ही निरंतर चालू राहणाऱ्या जीवन-चक्राची आदिम लय आहे. ही लय तिच्यातील सूक्ष्म स्पंदनांसकट शब्दबद्ध करण्यात कवयित्रीला यश मिळाले आहे. ही लय निसर्गाचे तरल विभ्रम, स्त्री-पुरुष नात्यातील भावनिक ओढ आणि जीवनरहाटीचे संथ तरीही उत्कट पार्श्वसंगीत यांतून व्यक्त झाली आहे. 'आतले खूप काही' बोलू इच्छिणारी ही कविता शब्दांचे अलवारपण आणि प्रतिमांचे स्वयंप्रकाशित्व जाणून आहे. त्यामुळे समकालीन स्त्री-काव्यात स्वत:चा आब राखणारी ही कविता वेगळेपणाने उठून दिसते.

स्त्री-पुरुष नात्यातील प्रेमानुभवाच्या विविध भावछटा व्यक्त करणाऱ्या यातील कवितांमध्ये आसक्तीचा चिवट रंग येतो, ताणतणावांच्या निराशेत लोटणारा आणि पुन्हा स्वत:चा शोध घ्यायला उद्युक्त करणारा पोपटी पालवीचा रंगही येतो. प्रेमातील आशानिराशा, साफल्य-वंचना या परस्परविरुद्ध भावनांचे आकार एकात एक मिसळून कसे जातात; ते यातील काही कवितांमधून नेमकेपणाने जाणवते. उदाहरणार्थ,

१. ''नाकारत नाही तुझं असं विस्तारत जाणं आणि नाकारत नाही अर्थातच
माझं पानं गळणाऱ्या फांद्यांचं सुनेपण...

(अपरंपार निळ्या पोकळीवर लहानशी नक्षी कोरणारं!) तरीही जुळवलीत बोटं तुझ्या बोटांमधून, उष्ण... आसक्त''('आसक्त') (पृ० २६)

२. ''आता तू देऊ नकोस हलकासाही झोका
नियतीनं समोर आणलेल्या नाजूक डहाळीला,
हृदयाशी घे... सुगंधी फुलांचा झेला''   ('तर ऐक' पृ० ३९)

३. ''पाणी ओसरल्यावर / तळचे दगडगोटे चमत्कारिकपणे बोलत सुटावेत/
तसंच झालं / वर्ष वाहून जाताना''   ('वेगळी वाट', पृ० १०३)

'डेंजरस गेम', 'अस्वस्थ करताहेत', 'किती भरभरून बोलायचो', 'वाघ' यांसारख्या कवितांमधून प्रेमातील सलणाऱ्या जागा सूक्ष्म संवेदनांसकट टिपल्या आहेत.

समकालीन स्त्रीविश्वातील अस्वस्थता व्यक्त करणाऱ्या काही कविताही यात आहेत. 'जन्मजात कठपुतळी', 'बाई काय करू?', 'काहीच केलं नाही मी तसं', 'गोफणगुंडे' या कविता पारंपरिकतेच्या ओझ्याखाली दबून गेलेल्या स्त्रीमनाची व्यथा व्यक्त करतात. त्याचवेळी 'ओली लाकडं', 'पालवी', 'सूर्यफुलं', 'डौलात निघालीय गोगलगाय' यांसारख्या कविता स्त्रीचे बदलते आत्मभानही सूचित करतात. स्त्रीत्वातील वात्सल्याचा धागा कवयित्रीला जगण्याशी जोडणारा म्हणून महत्त्वाचा वाटतो. यातील आईपणाचे अनुभव सांगणाऱ्या कविता परंपरेतील सत्त्व जपू पाहतात. बदलत्या वास्तवात स्त्रीपुरुष नात्यांमध्ये निकोप मैत्रीचा पूल उभारण्याची गरज 'निरंतर वास्तव' या दीर्घकवितेतून अधोरेखित होते. 'आकाशभर चांदण्या' ही यातील कविता घरगुती तपशिलांची गुंफण साधत रंगगंधनाद संवेदना जाग्या करते आणि दैनंदिन जीवनाची साधी चाकोरीही किती लयबद्ध, सौंदर्यपूर्ण असते, याची जाणीव करून देते. 'खडकांवर डोकी फोडताहेत', 'कालगती', 'आभासराई', 'एवढंच कळतं' या कविताही जीवनप्रेमाने ओतप्रोत भरलेल्या आहेत.

'मितवा' ही उषा मेहतांची एक दीर्घ कविता स्वतंत्रपणे प्रकाशित झाली आहे. प्रेमाचे सर्वस्पर्शित्व आणि सार्वकालिक अस्तित्व त्यातून जाणवते. प्रियकराशी केलेला संवादच यात काव्यात्म रूपात आला आहे. प्रेमभावनेतील माधुर्य अनुभवण्यासाठी आवश्यक ती मनाची कोवळीक जपता यायला हवी आणि नात्यांमुळे स्वत:ला आणि इतरांनाही समृद्ध होता येते, हे अनुभवता यायला हवे; हे यातून सुचवले आहे. आजच्या वास्तवाशी संबंधित नवे संदर्भ यातील स्त्री जाणिवेला अर्थातच दिले आहेत. मात्र ही दीर्घकविता काही ठिकाणी भावुक तर काही ठिकाणी बोधपर होते. तरीही प्रेमानुभवाकडे पाहण्याची त्यातील रसरसशीत दृष्टी लक्षात राहतेच.

■

3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. 5, पुणे 411 002.
दूरभाष : (020) 2448 6015

# भारतातील भाषाविज्ञानाची ५० वर्षे

रेणुका ओझरकर

भारताला भाषाविषयक अभ्यासाची दीर्घ परंपरा असली, तरी आधुनिक भाषाविज्ञानाचे शास्त्रशुद्ध आणि संस्थात्मक शिक्षण ही तशी नजीकच्या काळातील घटना आहे. भाषाविज्ञानाच्या पदव्युत्तर (एम०ए०) शिक्षणाची भारतात सुरुवात झाल्याच्या घटनेला यावर्षी पन्नास वर्षे पूर्ण होत आहेत.

१९५८ साली पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयामध्ये भाषाविज्ञानाचा पहिला पदव्युत्तर विभाग स्थापन झाला. त्यापाठोपाठ भारतातील इतर काही विद्यापीठांमध्येही भाषाविज्ञानाचे पदव्युत्तर शिक्षण देण्यास सुरुवात झाली. आजमितीस भारतातील सुमारे तीसहून अधिक विद्यापीठांमध्ये या विषयाचे पदव्युत्तर शिक्षण दिले जाते.

भाषाविज्ञानाच्या पदव्युत्तर शिक्षणाच्या सुवर्णमहोत्सवी वर्षाच्या निमित्ताने, 'लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ इंडिया'तर्फे भरवली जाणारी 'अखिल भारतीय भाषावैज्ञानिक परिषद' यावर्षी डेक्कन महाविद्यालयात २६ ते २८ नोव्हेंबर या काळात भरविली गेली. १९७० साली याच ठिकाणी भरलेल्या पहिल्या परिषदेनंतर यावर्षीची तिसावी परिषद सुवर्णमहोत्सवाच्या निमित्ताने स्वगृही परत आली, असे म्हटले पाहिजे. डेक्कन महाविद्यालय, लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ इंडिया आणि केंद्रीय भाषासंस्थान, मैसूर या तीन संस्थांनी एकत्रितपणे या परिषदेचे आयोजन केले होते.

यावर्षीच्या परिषदेमध्ये भारतातील विद्यापीठांचे भाषा आणि भाषाविज्ञान विभाग, संबंधित संस्था, आय०आय०टी० तसेच भाषांवर काम करणाऱ्या संगणक-तंत्रज्ञान संस्था अशा सुमारे पन्नास विविध संस्थांमध्ये कार्यरत असणारे, पावणेदोनशेहून अधिक संशोधक, शिक्षक व विद्यार्थी सहभागी झाले होते. इतकेच नव्हे, तर बांगलादेश, नेपाळ, थायलंड अशा शेजारील राष्ट्रांमधील भाषावैज्ञानिकांनी देखील हजेरी लावली होती. (डॉ० बी० आर० के० रेड्डी यांनी म्हटल्याप्रमाणे भारतातील भाषावैज्ञानिकांच्या चार पिढ्या परिषदेस हजर होत्या. सर्वात जुन्या पिढीचे प्रतिनिधी म्हणून ज्येष्ठ भाषावैज्ञानिक व द्रविडियन लिंग्विस्टिक असोसिएशनचे संस्थापक डॉ० वी० आय० सुब्रमणियम उपस्थित होते.) तीन दिवसांच्या या परिषदेमध्ये वाक्यविचार (सिंटॅक्स),

पदिमविचार (मॉर्फोलॉजी), ध्वनिविचार, सामाजिक भाषाविज्ञान, संगणकीय भाषाविज्ञान (कॉम्प्युटेशनल लिंग्विस्टिक्स), मनोभाषाविज्ञान व चिह्नभाषा, व्याकरणाच्या अभ्यासपरंपरा, भाषांतर व शैलीविज्ञान, भाषाशिक्षण, अर्थविज्ञान व कार्यलक्ष्यी मीमांसा (सिमँटिक्स व प्रॅग्मॅटिक्स) भाषेचे नियोजन आणि भाषाविषयक धोरणे तसेच भाषेचा इतिहास अशा विविध क्षेत्रांतील सुमारे नव्वद शोधनिबंध सादर करण्यात आले. त्याशिवाय चार विशेष व्याख्यानेही आयोजित करण्यात आली होती.

परिषदेमध्ये गेल्या पन्नास वर्षांतील भारतातील भाषाविज्ञानाच्या अभ्यासातील बदलत्या प्रवाहांचा वेध घेण्यात आला. आज भाषा आणि तंत्रज्ञान यांची सांगड घालणाऱ्या (संगणकीय भाषाविज्ञान) वाक्तंत्रज्ञान यांसारख्या क्षेत्रांचे महत्त्व वाढीस लागत आहे. त्याचेच प्रतिबिंब परिषदेमध्येही दिसून आले. सुवर्णमहोत्सवी सोहळ्याचे उद्घाटक डॉ० विजय भटकर, बीजभाषण करणारे डॉ० उदयनारायण सिंह यांच्यापासून ते विशेष वक्त्यांपैकी डॉ० उमामहेश्वर राव आणि डॉ० पेरीभास्कर राव यांच्यापर्यंत अनेकांनी भाषाभ्यासाला तंत्रज्ञानाची जोड देण्यावर भर दिला; भाषा व तंत्रज्ञानाची सांगड कशी घालता येईल आणि त्याचे काय फायदे आहेत हेही या वक्त्यांनी सांगितले. परिषदेतील संगणकीय भाषाविज्ञानासारख्या उपयोजित क्षेत्रांतील सत्रांना मिळालेला प्रतिसाद आणि या क्षेत्रातील शोधनिबंधांची भरघोस संख्या यातूनही या क्षेत्रांचा परिषदेवरील प्रभाव जाणवत होता.

परिषदेचे उद्घाटन केंद्रीय भाषासंस्थानचे संचालक डॉ० उदयनारायण सिंह यांच्या बीजभाषणाने झाले. डॉ. सिंह यांनी भारतातील बदलत्या भाषिक परिस्थितीकडे लक्ष वेधले. बहुभाषिकतेची जुनी परंपरा असणाऱ्या भारतामध्ये भाषा टिकवून ठेवण्याकडे कल असे. आज मात्र अशी परिस्थिती राहिलेली नसल्याचे डॉ० सिंह म्हणाले. भारतातील अल्पसंख्याकांच्या भाषांची (मायनॉरिटी लँग्वेजिस) अधिकाधिक दुरवस्था होत आहे. याही भाषा बोलणाऱ्या मुलांना आपल्या मातृभाषेतून शिक्षण मिळाले पाहिजे; त्यासाठी व्यापक प्रमाणावर प्रयत्नांची गरज आहे. 'मातृभाषेतून शिक्षण म्हणजे केवळ प्रमुख प्रादेशिक भाषांमधून शिक्षण नव्हे', हे डॉ० सिंह यांनी स्पष्ट केले.

शिक्षणाच्या प्रसारामुळे दिवसेंदिवस शाळेमध्ये प्रवेश घेणाऱ्यांची संख्या भारतात वाढत असली तरी दुर्दैवाने शाळेतून गळती होण्याचे प्रमाणही वाढतच चालले आहे. आणि त्याला एक कारण अल्पसंख्याकांच्या भाषा बोलणाऱ्या मुलांच्या भाषिक अनुभवाकडे शिक्षणामध्ये लक्ष न पुरवणे हे आहे. शिक्षणाचे योग्य नियोजन आणि शिक्षणामध्ये अल्पसंख्याकांच्या भाषांना योग्य स्थान देणे यांद्वारे भाषांची आणि त्या भाषा बोलणाऱ्या समाजांची दुरवस्था रोखता येईल. भाषांचे दस्तऐवजीकरण करणे,

भाषाशिक्षणाची सोपी साधने तयार करणेसुद्धा आवश्यक आहे. आणि अशा कामांमध्ये तंत्रज्ञानाचा फायदा भाषावैज्ञानिकांना होऊ शकतो असे डॉ० सिंह यांनी सांगितले. तरुण, उदयोन्मुख भाषावैज्ञानिकांना डॉ० सिंह यांनी, ''भाषाविज्ञानाच्या कोणत्याही क्षेत्रात पारंगत व्हा, पण आपला थोडासा वेळ याही कामांसाठी द्या,'' असे तळमळीने आवाहन केले.

डॉ० सिंह यांनी बदलत्या भाषिक परिस्थितीचा वेध घेतला, तर डॉ० बी० आर० के० रेड्डी यांनी भाषाविज्ञानाच्या भारतातील शिक्षणातील बदलत्या प्रवाहांचा आढावा घेतला. डॉ० रेड्डी यांनी आधुनिक भाषाविज्ञानाची परंपरा भारतात सुरू करण्यामध्ये डॉ० सुनीतिकुमार चटर्जी, डॉ० तारापोरवाला व डॉ० सु० म० कत्रे यांचे मोठे योगदान असल्याचे नमूद केले. तसेच रॉकफेलर फाउंडेशनने आयोजित केलेले उन्हाळी वर्ग आणि डेक्कन महाविद्यालयाची भूमिका यांचाही उल्लेख केला. डॉ० रेड्डी यांच्या मते, सुरुवातीच्या काळात भारतातील या विषयाच्या शिक्षणावर ब्लूमफील्ड-हॉकेटप्रणीत संरचनावादाचा पगडा होता. सत्तरीच्या दशकामध्ये त्याची जागा चॉम्स्कीप्रणीत व्याकरणपरंपरेने घेतलेली दिसून येते. मात्र हा काहीसा एकांगी प्रवास झाल्याचे डॉ० रेड्डी यांना वाटत असल्याचे जाणवत होते. त्यांनी अशी खंत व्यक्त केली की चॉम्स्कीप्रणीत व्याकरणपरंपरा महत्त्वाची आहे हे खरेच; पण त्यावरच भारतात काही ठिकाणी अनावश्यक, एकांगी पद्धतीने भर दिला जातो आहे. विद्यापीठ अनुदान आयोगानेही त्याच अनुषंगाने आपला अभ्यासक्रम बनविला आहे. त्यामुळे जणू चॉम्स्कीप्रणीत व्याकरण परंपरेचा प्रवाहच मुख्य प्रवाह बनल्यासारखे झाले आहे. या प्रवाहात नसलेल्या पण भाषाविज्ञानाच्या अभ्यासाची भारतात मुहूर्तमेढ रोवणाऱ्या अन्नामलाई विद्यापीठ, केरळ विद्यापीठ यांसारख्या प्रमुख संस्थांचे महत्त्व आणि कार्य दुर्लक्षित होऊ लागले आहे. त्याचबरोबर प्रत्यक्ष क्षेत्रांमध्ये जाऊन विविध भाषांचा अभ्यास व दस्तऐवजीकरण करण्याची आपली परंपरा काळाच्या ओघात खंडित झाली आहे असेही डॉ० रेड्डी म्हणाले. ही परंपरा पुनरुज्जीवित करण्याची गरज असल्याचे त्यांनी सांगितले. पन्नास-साठच्या दशकामध्येच 'लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ इंडिया'ने भारतीय विद्यापीठांमध्ये भाषाविज्ञानाला उत्तेजन देण्यासाठी एक आराखडा मांडला होता. त्यातच नव्याने भाषांचे सर्वेक्षण करण्याविषयीही आग्रह धरण्यात आला होता. परंतु, क्षेत्रीय अभ्यासाची परंपराच खंडित झाल्यामुळे आजवर हे नवीन सर्वेक्षण प्रत्यक्षात येऊ शकलेले नाही. अल्पसंख्याकांच्या भाषांसाठीही विशेष प्रयत्न करण्याची गरज असल्याचे डॉ० सिंह यांच्याप्रमाणेच डॉ० रेड्डी यांनीही ठासून सांगितले. यासाठी भाषातंत्रज्ञानाचा फायदा होऊ शकत असला, तरी आज या क्षेत्रामध्ये संस्कृत भाषेवरच

लक्ष केंद्रित होत आहे, तसे न होता इतर भारतीय भाषा, अल्पसंख्याकांच्या भाषांवर भाषातंत्रज्ञानक्षेत्रात काम केले गेले पाहिजे, असे डॉ० रेड्डी म्हणाले.

भाषातंत्रज्ञानाच्या क्षेत्रात काम करताना येणाऱ्या अडचणी आणि त्यांचे निराकरण याविषयी जपानमधील दक्षिण आशियाई अभ्यासकेंद्रात कार्यरत असणाऱ्या डॉ० पेरीभास्कर राव यांनी रोचक शैलीत विवेचन केले.

या परिषदेमध्ये जे शोधनिबंध सादर करण्यात आले, त्यांपैकी बहुतांश भारत आर्य कुळातील हिंदी, भोजपुरी, बुंदेली, बांगला, मराठी, गुजराती अशा भाषांशी संबंधित होते. इतर, म्हणजे द्राविड, ऑस्ट्रो-आशियाई आणि तिबेटो - बर्मन कुळांमधील भाषांवरील निबंधांची संख्या कमी होती. खेदजनक बाब अशी की पुण्यामध्ये परिषद भरली असूनही मराठी आणि पश्चिम भारतातील इतर भाषांवरील निबंधांची संख्या फारच थोडी होती. मराठीच्या वाक्यविचारासंदर्भात तिच्यातील 'असे', 'म्हणून' आणि 'की' या वाक्ये जोडणाऱ्या अव्ययांच्या वैशिष्ट्यांचे विवेचन एका निबंधात करण्यात आले. संगणकीय भाषाविज्ञानामध्ये मराठीविषयी काही विचार मांडण्यात आले. मुंबईतील गुजराती समाजाच्या बोलीभाषेतील ध्वनिव्यवस्थेत काय बदल होत आहेत याविषयी एका निबंधामध्ये निरीक्षणे नोंदवण्यात आली. पुण्यातील जैन समाजाची गुजराती बोली गुजरातमध्ये बोलल्या जाणाऱ्या या समाजाच्या बोलीपेक्षा कशी वेगळी आहे, तसेच हे वेगळेपण मराठीशी झालेल्या देवाणघेवाणीमुळे आले आहे असे एका निबंधातून स्पष्ट करण्यात आले. सामाजिक भाषाविज्ञान विभागामध्ये एका निबंधातून मराठी - कोकणीच्या वादाचा आढावा घेण्यात आला. महादेव कोळी समाजाच्या बोलीतील वैशिष्ट्येसुद्धा एका निबंधात मांडण्यात आली. मात्र अशा काही थोड्या निबंधांचा अपवाद वगळता, या भाषांचे फारसे अस्तित्व परिषदेमध्ये जाणवले नाही. सिंधीसारख्या या क्षेत्रातील इतर भाषा पूर्णपणे दुर्लक्षित राहिल्या. पश्चिम भारतात, अजूनही भाषाभ्यासाविषयी, आधुनिक भाषाविज्ञानाविषयी उदासीनता असल्याचेच हे निदर्शक होते. या परिषदेमध्ये भारतातील अल्पसंख्याकांच्या भाषांच्या दुरवस्थेकडे, प्रत्यक्ष क्षेत्राभ्यासाकडे होणाऱ्या दुर्लक्षाकडे लक्ष वेधण्यात आले; तसेच आपल्या या उणिवा दूर करण्याच्या दृष्टीने भाषा व तंत्रज्ञानाची सांगड घालण्याच्या आवश्यकतेवर भर देण्यात आला. तीन दिवसांच्या या परिषदेच्या निमित्ताने भारतातील भाषाविज्ञानाच्या अभ्यासातील समस्या, उणिवा तसेच आपली बलस्थाने यांवर गांभीर्याने चर्चा होण्याची गरज आहे. ■

701, डी - 3 ब्रह्मांड डी ब्लॉक्स, पो० ऑ० सॅण्डोज बाग, आझादनगर, घोडबंदर रोड, ठाणे 400 607. दूरभाष (022) 2589 6624 भ्रमणभाष 98195 98730

# मराठीला पर्याय

शरद गोखले

महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे यांच्या १७.११.२००८ च्या परिपत्रकानुसार उच्च माध्यमिक स्तरावर (इयत्ता ११वी व १२वी) इंग्रजी भाषा या अनिवार्य विषयासह वैकल्पिक गटात इंग्लिश लिटरेचर हा विषय अभ्यासण्याची अतिरिक्त सोय उपलब्ध करून देण्यात आली आहे. म्हणजेच मराठी विषयाला आजवरच्या अनेक विकल्पांमध्ये आणखी एका विकल्पाची भर पडली आहे. आता मराठी विषयासाठी एकूण विकल्प पुढीलप्रमाणे आहेत :
(१) कोणतीही आधुनिक भारतीय भाषा, (२) कोणतीही परदेशी भाषा, (३) कोणतीही अभिजात भाषा, (४) माहिती तंत्रज्ञान, (५) संगणक विज्ञान, (६) सामान्य ज्ञान (सैनिकी शाळांसाठी) आणि आता (७) इंग्लिश लिटरेचर.

मराठी विषय उच्च माध्यमिक पातळीवर अनिवार्य करण्याची मागणी डावलून उलट तो आहे त्या स्थितीतही शिकला व शिकवला जाऊ नये याची तरतूद या परिपत्रकानुसार केली आहे. इंग्रजी प्रचलित व इंग्रजी लिटरेचर अशी इंग्रजीला अतिरिक्त महत्त्व देणारी व्यवस्था कोणाच्या हितसंबंधांतून व दबावाखाली निर्माण करण्यात आली आहे? प्रचलित इंग्रजी विषयात इंग्रजी साहित्याचा समावेश असताना त्याची स्वतंत्र अभ्यासपत्रिका आणि तीही मराठीला विकल्प म्हणून देण्याची काय आवश्यकता होती?

■

दै० 'महाराष्ट्र टाइम्स', ०५.०३.२००९

**वर्गणीदारांना सूचना**

(१) अनेकवेळा अंक पत्ता बदलल्यामुळे परत येतात. तेव्हा वर्गणीदारांनी बदललेला पत्ता कार्यवाहांना कळविण्याची तसदी घ्यावी.

(२) अंकाविषयी अभिप्राय, सूचना, शंका इत्यादी लिखित स्वरूपात कळविल्यास त्या साऱ्यांचा यथायोग्य विचार करणे सोयीचे जाते. वाचकांकडून प्रतिसादाची अपेक्षा असते.





अनुक्रमणिका

# मराठी अभ्यास परिषद : सिंहावलोकन व पुढील दिशा

मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारिणीसाठी पंचवार्षिक निवडणूक फेब्रुवारी २००९ मध्ये पार पडली. नवीन कार्यकारिणीने कार्यभार स्वीकारण्याच्या निमित्ताने मराठी अभ्यास परिषदेच्या गेल्या २७ वर्षांतील कामगिरीचे सिंहावलोकन करावे आणि पुढील पाच वर्षांत करावयाच्या कामाबाबत नवीन कार्यकारिणीला मार्गदर्शन व्हावे म्हणून परिषदेच्या काही हितचिंतक भाषाप्रेमींची एक सभा शनिवार, दि० १४ मार्च २००९ला श्रीमती ना०दा० ठाकरसी विद्यापीठाच्या पदव्युत्तर विभागाच्या सभागृहात आयोजित करण्यात आली होती. सभेला २८ मान्यवर आवर्जून उपस्थित राहिले. त्यांनी आपली मते व्यक्त केली आणि काही सूचना केल्या.

परिषदेच्या आजवरच्या कामगिरीत 'भाषा आणि जीवन' या त्रैमासिकाचे नियमित होत असलेले प्रकाशन, त्याला मिळालेली विद्याक्षेत्रातील मान्यता, महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार, अमराठी (विशेषत: अभारतीय) विद्यार्थ्यांसाठी प्रकाशित केलेली (डॉ० मॅक्सीन बर्नसनलिखित) पाच पाठ्यपुस्तके, चिकटचिठ्ठ्यांचे प्रकाशन, चर्चासत्रे व व्याख्याने यांचे आयोजन इत्यादींचा डॉ० नीलिमा गुंडी यांनी उल्लेख केला. पण पुस्तक-प्रकाशन, संशोधन प्रकल्प संज्ञाकोश, संदर्भ ग्रंथालय इ० मनसुबे, जागा व निधी यांच्या अभावामुळे अपूर्ण आहेत; एवढेच नव्हे तर संस्थेच्या घटनेतील इतर काही उद्दिष्टेही अपूर्ण आहेत असे प्रा० प्र० ना० परांजपे यांनी सांगितले.

या प्रास्ताविकानंतर सुमारे दीड तास मनमोकळी चर्चा झाली. त्यामध्ये मुकुंदराव किर्लोस्कर, आशा मुंडले, कल्याणी दिवेकर, विद्या पटवर्धन, सुमन गोरे, स्नेहल तावरे, अनिल गोरे, सुजाता शेणई, य० ना० वालावलकर, उमेश करंबळेकर, हृषिकेश आठल्ये, रेखा इनामदार-साने, लीला दीक्षित, सलील कुळकर्णी, विजय पाध्ये इत्यादींनी आपले विचार मांडले. मराठी अभ्यास परिषदेने विविध गटांसाठी (उदा० अमराठी विद्यार्थी, अमराठी पालक, कंपन्यांमधील अमराठी अधिकारी, विदेशी नागरीक इत्यादी) वेगवेगळ्या मुदतींचे भाषिक अभ्यासक्रम स्वतंत्रपणाने किंवा अन्य संस्थांच्या सहकार्याने सुरू करावेत; वेगवेगळ्या वयोगटांना व वेगवेगळ्या स्वभाषकांना मराठी कसे शिकवावे

या संबंधीच्या कार्यशाळा, चर्चासत्रे इत्यादींचे शिक्षकांसाठी आयोजन करावे; यासंबंधीच्या मार्गदर्शक पुस्तिका प्रकाशित कराव्यात; मराठीतील आधुनिक अभिजात कादंबऱ्या, नाटके इत्यादींचा तरुण पिढीला परिचय करून देण्यासाठी त्यांच्या संक्षिप्त आवृत्त्या प्रकाशित कराव्यात अशा अभ्यासक्रमविषयक सूचना करण्यात आल्या.

'भाषा आणि जीवन'बद्दलही बऱ्याच सूचना करण्यात आल्या. सध्याचे स्वरूप गंभीर, 'अभ्यास'प्रधान आहे, त्यामुळे तरुणवर्गाला ते आकर्षित करू शकत नाही, ते अधिक चुरचुरीत, आकर्षक व रंजक व्हावे यासाठी त्यात विनोद, कोडी, ललितलेखन यांचाही समावेश करावा; त्रैमासिकाऐवजी ते द्वैमासिक किंवा मासिक करावे; भाषिक व सांस्कृतिक घटनांचा त्यात समावेश करावा; त्याचा सध्याचा पुस्तकाचा आकार बदलून तो इतर नियतकालिकांसारखा मोठा करावा; मराठीतून चालणाऱ्या विविध संकेतस्थळांची माहिती व पत्ते द्यावेत इत्यादी सूचनांचा त्यांत समावेश होता. महाराष्ट्र व केंद्र सेवा आयोगाच्या परीक्षांसाठी त्यातून मार्गदर्शन करावे अशीही एक सूचना करण्यात आली.

भाषा, भाषिक समस्या, भाषिक घडामोडी यांविषयी वृत्तपत्रे व नियतकालिकांतून लेखन करू शकणारा लेखक गट परिषदेने संघटित करावा, विविध बोलींतील शब्द प्रमाणभाषेत रुळवण्यासाठी जागरूक प्रयत्न करावेत, 'शुद्ध' व 'अशुद्ध' भाषा या शब्दांऐवजी अनुक्रमे 'प्रमाण' व 'बोली' भाषा हे शब्द पाठ्यपुस्तकांत वापरावेत असा आग्रह धरावा; शालान्त परीक्षेच्या गुणवत्ता यादीत ग्रामीण पार्श्वभूमीचे विद्यार्थी अधिक आढळतात कारण ते मराठी माध्यमातून शिकतात व त्यामुळे त्यांचे आकलन सखोल व व्यापक असते या वस्तुस्थितीला ठळक प्रसिद्धी द्यावी; सहकारी संस्थांची इतिवृत्ते मराठीतूनच लिहिली जावीत यासाठी प्रयत्न करावेत. महाराष्ट्रातील विद्यापीठांचा कारभार मराठीतून चालावा अशी अपेक्षा असूनही श्रीमती ना० दा० ठाकरसी विद्यापीठ मात्र इंग्रजीचाच उपयोग करते याला विरोध करावा अशा इतरही अनेक सूचना करण्यात आल्या. शेवटी परिषदेतर्फे प्रा० आनंद काटीकर सर्व उपस्थितांचे आभार मानले.

■

**- आनंद काटीकर,**
**प्र० ना० परांजपे**

# मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या निवडणुकीचा निकाल

मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या पंचवार्षिक निवडणुकीचा कार्यक्रम घटनेतील तरतुदीनुसार दि० २२ जानेवारी २००९ला सुरू झाला. सर्व आजीव सदस्यांना निवडणुकीसंबंधी सूचना टपालाने पाठविण्यात आली. या निवडणुकीद्वारे पुणे महानगरपालिका-हद्दीतील सात सभासद आणि पुणे महानगरपालिका - हद्दीबाहेरील दोन असे एकूण नऊ सभासद निवडून द्यायचे होते.

निवडणूक-सूचनेला अनुसरून पुण्यातील सात जागांसाठी सात आणि पुण्याबाहेरील दोन जागांसाठी दोन उमेदवारांचे अर्ज अखेरच्या मुदतीपर्यंत म्हणजे दि० १४ फेब्रुवारी २००९ला सायंकाळी पाच वाजेपर्यंत प्राप्त झाले. नावे मागे घेण्याच्या मुदतीपर्यंत म्हणजेच दि० १७ फेब्रुवारी २००९ला सायंकाळी पाच वाजेपर्यंत कोणीही अर्ज मागे घेतला नाही. त्यामुळे या नऊही उमेदवारांचे अर्ज वैध राहिले. त्यामुळे हे नऊही उमेदवार मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारी मंडळावर सदस्य म्हणून बिनविरोध निवडून आले आहेत; असे मी या पत्रकाद्वारे जाहीर करते.

निवडून आलेल्या उमेदवारांची नावे पुढे दिली आहेत :

(अ) पुणे महानगरपालिका - हद्दीतील सात सदस्य :

( १ ) प्रा० प्रभाकर नारायण परांजपे
( २ ) डॉ० नीलिमा माधव गुंडी
( ३ ) डॉ० मृणालिनी प्रवीण शहा
( ४ ) श्रीमती विजया नंदकुमार चौधरी
( ५ ) प्रा० आनंद व्यंकटेश काटीकर
( ६ ) श्री० विजय प्रभाकर पाध्ये
( ७ ) प्रा० रंजना मोहन फडके

(आ) पुण्याबाहेरील दोन सभासद :

( १ ) डॉ० मॅक्सीन बर्नसन (फलटण)
( २ ) डॉ० प्रभाकर ज. जोशी (अमळनेर)

वरील नऊ सभासद पुढील पाच वर्षांसाठी परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे सभासद राहतील. म्हणजेच त्यांची मुदत दि० ३१ मार्च २०१४पर्यंत राहील.

डॉ० स्नेहल तावरे, निवडणूक अधिकारी

# महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार : २००८

रंजना फडके

मराठी अभ्यास परिषद 'बँक ऑफ महाराष्ट्र'च्या सहकार्याने १९८३ पासून भाषाविषयक उत्कृष्ट लेखनासाठी पुरस्कार देते. २००८चा 'महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार' (रु० ५,०००/-) 'मराठी शब्दलेखनकोश' (प्रा० यास्मिन शेख, मनोविकास प्रकाशन, पुणे) या पुस्तकाला शुक्रवार, दि० १६ जानेवारी २००९ रोजी प्रमुख पाहुणे डॉ० प्रमोद तलगेरी (कुलगुरू, मल्टिव्हर्सिटी, पुणे) यांच्या हस्ते समारंभपूर्वक देण्यात आला. अध्यक्ष प्रा० प्र० ना० परांजपे, परीक्षक डॉ० सरोजा भाटे, कार्यवाह डॉ० नीलिमा गुंडी इत्यादी मान्यवर व्यासपीठावर उपस्थित होते.

वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या सभागृहात आयोजित करण्यात आलेल्या या कार्यक्रमाचे प्रास्ताविक मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यवाह डॉ० गुंडी यांनी केले. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाचा घटक बनलेल्या या संस्थेच्या कार्याचा आढावा त्यांनी घेतला. आणि व्यासपीठावरील मान्यवर पाहुण्यांचा परिचय करून दिला. अध्यक्ष प्रा० परांजपे यांच्या हस्ते पाहुण्यांचे पुष्पगुच्छ देऊन स्वागत करण्यात आले. परीक्षक समितीचे सदस्य डॉ० सरोजा भाटे, डॉ० अंजली सोमण, प्रा० आनंद काटीकर यांचे व महाराष्ट्र बँकेचे आर्थिक साहाय्यक अधिकारी श्री० मधुकर तापीकर यांचेही अध्यक्षांनी पुष्पगुच्छ देऊन स्वागत केले.

परीक्षकांच्या वतीने प्रातिनिधिक स्वरूपात मनोगत व्यक्त करताना डॉ० भाटे म्हणाल्या, ''काळाची गरज या पुस्तकाने भागवण्याचा मन:पूर्वक प्रयत्न केलेला आहे.'' अनेक शब्दांची उदाहरणे देऊन त्यांनी आपले म्हणणे स्पष्ट केले. यानंतर प्रमुख पाहुण्यांच्या हस्ते प्रा० शेख यांना रु० ५०००/-चा धनादेश, पुष्पगुच्छ आणि सन्मानपत्र प्रदान करण्यात आले. आपल्या उत्तराच्या भाषणात प्रा० शेख यांनी ''आजचा दिवस भाग्याचा व समाधानाचा आहे'' असे सांगितले. भाषेत शुद्ध-अशुद्ध काही नसते असे मानल्यामुळे शुद्धलेखनाकडे दुर्लक्ष होत आहे या वस्तुस्थितीकडे सर्वांचे लक्ष वेधले आणि ''महामंडळाने केलेले व शासनाने मान्य केलेले शुद्धलेखनाचे नियम पाळले पाहिजेत'' असेही सांगितले. प्रमुख पाहुणे डॉ० तलगेरी यांनी ''भाषा ही राष्ट्राची अस्मिता असते. शब्दकोश भाषेच्या विकासासाठी आवश्यक आहेत. प्रा० शेख

यांचे हे पुस्तक म्हणजे भाषाशुद्धीची चळवळच आहे.'' असे मत व्यक्त करून लेखिकेचे अभिनंदन केले आणि महाराष्ट्र बँकेचा या चांगल्या कार्याबद्दल गौरव केला.

अध्यक्षीय मनोगत व्यक्त करताना प्रा० प्र० ना० परांजपे म्हणाले, ''मराठी भाषा टिकेलच. एक हजार वर्षे ती टिकून आहे. तिचा विकास, बदल होतोय. त्याचा व्यवस्थित विचार करण्याची गरज आहे. त्यासाठी संस्थात्मक स्वरूपात कार्य व्हायला हवे.'' महाराष्ट्र बँकेच्या वतीने श्री० तापीकर यांनी 'महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार' देण्याचा हेतू सांगून सर्वांचे आभार मानले. श्रीमती विजया चौधरी यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले. ■

**परिषद वार्ता : ४**

## विद्युल्लेखा व अशोक अकलूजकरांशी गप्पा

गुरुवार, दि० ५ फेब्रुवारी २००९ रोजी पुणे येथे कॅनडातील व्हॅंकुव्हरमध्ये राहणाऱ्या मराठी लेखिका डॉ० विद्युल्लेखा अकलूजकर आणि संस्कृत व भाषाविज्ञानाचे प्राध्यापक, संशोधक डॉ० अशोक अकलूजकर यांच्याशी गप्पा मारण्याचा एक अनौपचारिक कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. दोन्ही पाहुण्यांनी आपले कार्यक्षेत्र, कॅनडातील मराठी संस्था, आपले सामाजिक कार्य इत्यादींबद्दलच्या प्रश्नांना मोकळेपणाने उत्तरे दिली. विद्युल्लेखा अकलूजकरांनी आपल्या काही कविताही वाचून दाखविल्या. 'सीमेवरी उभी मी' या त्यांच्या कवितेला विशेष दाद मिळाली. ■

**परिषद वृत्त**

परिषद पुढील देणगीदारांच्या (अनुकरणीय) देणग्यांबद्दल आभारी आहे :

१) श्री० द० वि० (अरविंद) टिकेकर — रु. १०,०००/-

२) डॉ० मिलिंद मालशे — रु. १,०००/-
(दहा संस्थांना/व्यक्तींना 'भाषा आणि जीवन'चे अंक एक वर्ष पाठविण्यासाठी)

३) रामचंद्र दत्तात्रय ट्रस्ट — रु. २,१२५/-
(सतरा शाळांना 'भाषा आणि जीवन'चे अंक एक वर्ष पाठविण्यासाठी)

४) डॉ० प्रमोद तलगेरी — रु. ९००/-

५) श्री० वि० चिं० फडके — रु. २००/-

# भाषा आणि मानसशास्त्र

कृष्ण श्री० अर्जुनवाडकर

श्री० उमाकांत रा० कामत यांचा लेख 'भाषा व भाषिक व्यवहार यांचा शरीरशास्त्रीय विचार आणि व्याकरणाची मांडणी' वाचून मनात आलेले विचार मांडावे, म्हणून हे लेख.

वास्तव शास्त्रांचा इतिहास पाहिला तर असे दिसते की सुरुवातीच्या काळात सायन्स या समान नावाखाली वास्तव जगाच्या घडणीविषयी सुचलेले विचार तत्त्वचिंतकांनी मांडले. या विषयाचा जसजसा अधिकाधिक अभ्यास होऊ लागला, तसतसे सुरुवातीला एका छत्राखाली नांदणारे विषय पदार्थविज्ञान, रसायन इत्यादी नावे धारण करून अलग होऊ लागले. गणित विषयातही अशीच उत्तरोत्तर क्रांती झाली. सुरुवातीला केवळ आकड्यांत होणारे गणित नंतरच्या काळात संकेताक्षरांनी होऊ लागले; त्याला बीजगणित नाव मिळाले. सायन्स इत्यादी वास्तव सृष्टिविषयक विषय, आणि गणित इत्यादी संकेताधिष्ठित साहाय्यक विषय या क्षेत्रांत हा जो विकास झाला, त्याचा आधार कोणता? अभ्यासाच्या दिशा आणि क्षेत्रे यांच्या अन्योन्यभेदांची प्रमाणे निर्धारित करण्यात मानवाने मिळविलेले यश, हा त्याचा आधार आहे.

भाषा या विषयाच्या अभ्यासातही अशाच घटना घडून शब्दरूपे आणि अर्थस्तर ही अभ्यासाची क्षेत्रे वेगळी झाली. संस्कृतापुरते सांगायचे तर यांपैकी पहिल्या क्षेत्रातले मूलगामी श्रेष्ठ कार्य पाणिनीच्या (इ० स० पूर्व ८००) 'अष्टाध्यायी' या प्राचीन सूत्रशैलीच्या ग्रंथात, तर दुसऱ्या क्षेत्रातले असे कार्य आनंदवर्धनाच्या (इ० स० ८४०...) 'ध्वन्यालोक' या चर्चात्मक ग्रंथात, दिसून येते. या दोघांनीही आपापल्या विषयाच्या मर्यादा आखून घेऊन, तर्कशुद्ध पद्धतीने त्याच्या अंगोपांगांचा विचार करून त्याचे मूलभूत स्वरूप मांडले. निर्धारित भाषेतली शब्दरूपे हा विषय पाणिनीने गणिताप्रमाणे अन्वयमुखाने (पॉझिटिव्हली) मांडला आहे; तर अर्थस्तर हा विषय आनंदवर्धनाने चर्चात्मक (डिस्कर्सिव्ह) शैलीने नव्या संकल्पना सिद्ध करून मांडला आहे. वाच्य, लक्ष्य आणि व्यंग्य असे अर्थाचे तीन स्तर आहेत. त्यापैकी वाच्य हा मूलभूत स्तर; उरलेले दोन त्यावर आधारलेले, संदर्भानुसार आणि वक्त्याच्या

विवक्षेनुसार येणारे. ते व्यवहारातल्या बोलण्यात प्रसंगानुसार येतात, म्हणून तर काव्यांत, नाटकांत येतात. उक्त दोन ग्रंथांतल्या शैली त्यांच्या लेखकांच्या आवडीनुसार ठरल्या. पाणिनीच्या विधानमुख सूत्रांत जिज्ञासूंच्या दृष्टीने चर्चाक्षम असे मुद्दे त्या विषयात अधिकारी अशा उत्तरकालीन विवेचनकारांना आढळले; ते भाष्य, टीका, उपटीका अशा वाङ्मयात मांडलेले आढळतात.

अशा तर्काश्रित मर्यादा आखून घेतल्या नाहीत, तर कोणत्या विषयाच्या चर्चेत कोणकोणत्या अन्य विषयांतले मुद्दे उपस्थित व्हावे, याला काही मर्यादाच राहणार नाही. रसायनशास्त्रात पाणी म्हणजे $H_2O$. ते गंगेचे की विहिरीचे की नळाचे, याच्याशी त्या शास्त्राला काही कर्तव्य नाही. व्याकरण हे शब्दरूप-शास्त्र आहे; त्याला भाषाव्यवहाराच्या वेळी मेंदूत होणाऱ्या (शारीर घटनेच्या) घडामोडींशी काय कर्तव्य आहे? संस्कृत परंपरेत न्यायशास्त्र, तर्कशास्त्र म्हणून जी शास्त्रशाखा आहे, तिच्या वारसांच्या तोंडी परंपरेने एक गमतीचे, विनोदी विधान येते. 'अस्माकूणां नैयायिकाणाम् अर्थरि तात्पर्यं, न तु शब्दरि ।' (आम्हां नैयायिकांचा भर अर्थावर असतो; शब्दांवर नाही.) या विधानातली बहुतेक रूपे व्याकरणदृष्टीने चुकीची आहेत. (हे वाक्य व्याकरणशुद्ध स्वरूपात असे होईल : 'अस्माकं नैयायिकानाम् अर्थे तात्पर्यं, न तु शब्दे।') याचा गर्भित अभिप्राय हा की तर्कशास्त्रीय चर्चेत व्याकरणाचे मुद्दे अप्रस्तुत आहेत. याच्या उलट, वैयाकरणाच्या तोंडी परंपरेने घातलेले विनोदी वाक्य आहे : भट्टस्य कट्यां सरट: प्रविष्ट:। (गुरुजींच्या कमरेत सरडा शिरला.) ऐकणाऱ्याने विचारले : छिद्राभावे कथं प्रविष्ट:? (कमरेला छिद्र नाही, तर सरडा शिरला कसा?) वैयाकरणाचे उत्तर : या वाक्यातले सर्व शब्द, रूपे व्याकरणशुद्ध आहेत. माझ्या दृष्टीने यात आक्षेपार्ह काही नाही. म्हणजे व्याकरणाच्या संदर्भात व्याकरणबाह्य मुद्दे अप्रस्तुत आहेत. नाक-कान-घशांचा डॉक्टर अन्य शरीरभागांविषयी सल्ला देणार नाही; कातडीचा तज्ज्ञ डॉक्टर फक्त कातडीच्या तक्रारींचाच विचार करील.

याचा अर्थ असा नव्हे, की भाषेचा एखाद्या नव्या अंगाने विचार करू नये. आतापर्यंत शास्त्रांचा विकास होत आला, तो नवनव्या अंगांनी विचार होण्यामुळेच. मुद्दा एवढाच की या नव्या अंगांच्या विचारांनी प्रस्थापित शास्त्राचा तर्कनिष्ठ पाया उखडून काढण्याचा प्रयत्न करू नये. असा प्रयत्न तर्कदुष्ट ठरेल.

■

'देवांगिनी', सुभाषनगर, शुक्रवार पेठ, पुणे 411 002.

## ‘सुरू’ आणि ‘चालू’

न० ब० पाटील

श्री० रमेश पानसे यांनी दुसऱ्या परिच्छेदात ‘भाषांतर करण्याचे काम ‘सुरू’ आहे’, ह्यावर आक्षेप घेतला आहे. ‘सुरू’ ऐवजी येथे ‘चालू’ म्हणणे योग्य होईल असे ते सुचवतात. परंतु अलीकडे हिंदीच्या संपर्कामुळे ‘चालू’ याला हीन अर्थ आला आहे. म्हणून ‘चालू’ याचा वापर विवेकानेच करावा लागेल.

‘सुरू’ असणे’ ही ‘सुरू होण्या’नंतरची क्रिया आहे. ‘सुरू होणे’ आणि ‘सुरू असणे’ हे दोन्हीही प्रयोग मराठी भाषेच्या धाटणीला धरून आहेत. ‘सुरू असणे म्हणजे ‘सुरू झालेले काम बंद झालेले नसणे.’ ‘नळ सुरू आहे.’ म्हणजे तो अजून बंद केलेला नाही. म्हणून ‘भाषांतराचे काम सुरू आहे.’ असे म्हणणे गैर नाही. ■

**संदर्भ :** हिवाळा २००९ अंक १. पृ० ७८

अ-37, कमलपुष्प, जन० अरुणकुमार वैद्य नगर, वांद्रे (पश्चिम), मुंबई 400 050
दूरभाष (022) 2642 9309

प्रतिसाद - ३

## ठार मारणे - एक अनुचित वापर

प्र० चिं० शेजवलकर

दूरचित्रवाणीवर आणि वृत्तत्रांत आपण ‘अपघातात अमुक इतकी माणसे ठार झाली’ अशी बातमी बघतो. माझ्या मते ‘ठार मारणे’ हा शब्दप्रयोग युद्धात करतात. युद्धाच्या वेळी शत्रूपक्षातील सैनिक मेले तर ‘हे सैनिक ठार झाले’ असे म्हणणे योग्य होईल. अपघाताच्या वेळी जर माणसे मेली तर ‘अमुक इतकी माणसे **दगावली**’ असं म्हणावयास हवं. अपघातात कोणी कोणाला ठार मारत नाही. अतिरेक्यांनी मुंबईत कित्येक माणसे मारली. तेव्हा तेथे ‘इतकी माणसे ठार झाली’ असं म्हणणं सयुक्तिक ठरेल. स्कूटरच्या अपघातात एखादा मेला तर लगेच आपण ‘स्कूटर अपघातात ठार झाला’ असं म्हणतो. ते मला अनुचित वाटतं. ■

एसएम इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट एज्युकेशन
47/16 एरंडवणे, कर्वे रस्ता, पुणे 411 004. दूरभाष (020) 2544 9743 / 2543 0327

## भाषा आणि जीवन : लेखन-सूची : २००८

गीतांजली मोडक, डॉ० मृणालिनी शहा

### १ : सदरे

**आवाहन**/२६:३ (पावसाळा)/पृ० २/ २६:४ (दिवाळी)/पृ० २

**ज्याची** त्याची प्रचीती/२६:२ (उन्हाळा)/ पृ० ४१-४४, ४५-४७, ४८-५०/ २६:४ (दिवाळी)/पृ० ४३-४५, ४६

**दखलयोग्य**/२६:१ (हिवाळा)/पृ० ५०-५१, ५२-५७/२६:२ (उन्हाळा)/पृ० ५४-५५, ५६-५९, ६०-६१/२६:३ (पावसाळा) पृ० ५८-५९

**परिषद-वार्ता**/२६:२ (उन्हाळा)/पृ० ७७-७८, २६:३ (पावसाळा)/पृ० ७४-७९

**पुस्तक-परीक्षणे**/२६:१ (हिवाळा)/पृ० ६०-६२, ६३-६६/२६:३ (उन्हाळा)/ पृ० ६०-६६, ६७-७०/ २६:४ (दिवाळी)/ पृ० ५४-५९, ६०-६६, ६७-७१, ७२-७६, ७७-८०

**परीक्षणासाठी** आलेली पुस्तके/२६:१ (हिवाळा) पृ० १८/ २६:२ (उन्हाळा) पृ० ६९/ २६:३ (पावसाळा) पृ० ५५/ २६:४ (दिवाळी) पृ० ८१

**पानपूरके**/२६:१ (हिवाळा) पृ० ३१,४३, ५७, ५९,६२,६६/२६:२ (उन्हाळा) पृ० ३२,४४,४७,५३,५५,५९,६१/ २६:३ (पावसाळा) पृ० ५२,६६, ७३,७९/२६:४ (दिवाळी) पृ० ५,१६, २०,२५,३०,३७,७१,७६,७९

**प्रतिसाद**/२६:१ (हिवाळी) पृ० ७२/ २६:२ (उन्हाळा) पृ० ६२,६८,७०,७१ २६:४ (दिवाळी) पृ० ८०,८२,८३

**मुखपृष्ठे**/मांडणी - विनय सायनेकर, सुप्रिया खारकर/
रेखाचित्रे - अनिल अवचट : २६:१, २६:३, २४:४/र०कृ० जोशी : २६:२

**लेखक-परिचय**/
२६:१ (हिवाळा) पृ० ७२/मलपृष्ठ ३/
२६:२ (उन्हाळा) पृ० मलपृष्ठ ३/
२६:३ (पावसाळा) पृ० ८०, मलपृष्ठ ३/
२६:४ (दिवाळी) पृ० ८४, मलपृष्ठ ३

**संपादकीय** /(१) साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षाची निवड अशी करता येईल?/ प्र०ना० परांजपे/२६:१ (हिवाळा) पृ० १-३.

(२) साहित्याचे सांस्कृतिक संदर्भ आणि भाषांतर/प्र०ना० परांजपे/२६:२ (उन्हाळा) पृ० १-२.

(३) नव्या शतकाची नांदी / नीलिमा गुंडी/ २६:३ (पावसाळा) पृ० ३-७.

(४) मराठी भाषेच्या विकासाच्या वाटा - ६ : राजाश्रय व लोकाश्रय/प्र०ना० परांजपे/२६:४ (दिवाळी) पृ० ३-५.

## २ : लेख

## ३ : लेखक

**लेखकांना आवाहन :**

पुढील विषयांसंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे आहे :
मराठी, अन्य देशीविदेशी भाषा, भाषांची तुलना (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये, इ० भाषाविज्ञान, भाषांतर, शैली (व्यवहारातील व साहित्यातील), भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन, परिभाषा, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय धोरणे, पुस्तक-परीक्षणे, पानपूरके, पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया, आपली भाषिक प्रचीती, मराठीच्या प्रादेशिक, व्यवसायविशिष्ट, वयोगटविशिष्ट, लिंगविशिष्ट बोलींची वैशिष्ट्ये, मराठी भाषेवरील इतर भाषांचा परिणाम, कवितांचे शैलीवैज्ञानिक विश्लेषण, कवितेची भाषा, साहित्याची भाषा, परिभाषाकोशांचा परिचय/परीक्षणे.

**भाषाविषयक लेखन-सूची : २००८**

**यशोधरा गणपतराव पवार**

(टीप : ही सूची परिपूर्ण नाही याची आम्हांला जाणीव आहे. वाचकांनी आपल्या वाचनात आलेले संदर्भ कळवून ही सूची पूर्ण करण्यास हातभार लावावा अशी विनंती आहे. - संपादक)

## १ : पुस्तके


**उजगरे**, नीलिमा/परकीय ख्रिस्ती मिशनरींचे मराठी भाषाविषयक कार्य : सन १५४२ ते १९६०/परममित्र पब्लिकेशन्स, ठाणे/पृष्ठे १००/ किंमत १०० रु०

**केळकर**, (डॉ०) अशोक रा./रुजुवात/लोकवाङ्मयगृह, मुंबई/पृष्ठे ३१६/किंमत ६०० रु०

**केळेकर**, रवीन्द्र/भाषिक संघर्षाचे समाजशास्त्र /अनुवादक डॉ० अरुणा दुभाषी/ राजहंस वितरण, पणजी/२००८/ पृष्ठे १७०/ किंमत १३५ रु०

**कुलकर्णी**, वसंत/मराठी कोश व संदर्भसाधने यांची समग्र सूची : इ. सन १८०० ते २००३/राज्य मराठी विकास संस्था, मुंबई/पृष्ठे १८०/किंमत २०० रु०

**गुंडी**, (डॉ०) नीलिमा/भाषाभान/उन्मेष प्रकाशन, पुणे /पृष्ठे १७१/ किंमत १५० रु०

**जोगळेकर**, (डॉ०) गं०ना०/महाराष्ट्र आणि मराठी भाषा/श्रीविद्या प्रकाशन, पुणे/ पृष्ठे १६४/किंमत २०० रु०

**डायमंड** अर्थशास्त्र कोश/डायमंड पब्लिकेशन्स, पुणे/पृष्ठे ८४५/किंमत ९०० रु०

**नसिराबादकर** (डॉ०) ल०रा०/व्यावहारिक मराठी/फडके प्रकाशन, कोल्हापूर/ पृष्ठे ३३४/किंमत १०० रु०

**पठाण**, (डॉ०) यु०म०/फारसी-मराठी व्युत्पत्ती कोश/राज्य मराठी विकास संस्था/ पृष्ठे २७५/ किंमत ६०० रु०

**पातुरकर**, (डॉ०) शुभांगी/छंद:शास्त्रीय समीक्षा/दिलीपराज प्रकाशन, पुणे/ पृष्ठे २०४/ किंमत २०० रु०

**बर्वे**, श्रीधर केशव/सुलभ चित्पावनी/पृष्ठे ६१/किंमत ४० रु०

**भारदे**, रमेश/मराठी शुद्धलेखनाच्या सोप्या वाटा/गीतामाई प्रकाशन, अहमदनगर/पृष्ठे ११४/ किंमत ६० रु०

**आहेर**, शुद्धोदन/भाषावाद आणि राष्ट्रवाद/महाराष्ट्र टाइम्स/१९ मार्च/पृ० ६

**के०**एस० राज्यश्री/छोट्या भाषांची कैफियत/सकाळ/ २८ मे/पृ० ६

## २ : दैनिके व नियतकालिके

**को**ठडिया, प्रशांत/सर्जनशील शिक्षण (सदर)/सकाळ/वर्णमालेच्या झरोक्यातून भाषा विकासाची आनंददायी अनुभूती/ १९ मार्च/पृ० २

**खै**रे, विश्वनाथ/संस्कृतची भारतीयता/ सकाळ/ १९ ऑगस्ट/पृ० ६

**गुं**डी, (डॉ०) नीलिमा/'म'मराठीचा/मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश संचालित/ मराठी महाविद्यालय सुवर्ण महोत्सव/ ८ मार्च /पृ० ६५-६६

**गो**रे, अनिल/हे राज्य 'मराठी' व्हावे ही इच्छा/ किस्त्रीम दिवाळी अंक/पृ० ४८-५७ आणि १२४

**चि**तळे, पु० के०/मायमराठीबद्दल आमच्याही भावना/अमृत/दिवाळी/वर्ष ५६ अंक १०/पृ० १६१-१७३

**चु**नेकर, जयवंत वसंत, 'मराठी भाषाभान', रुची मे, २००८, पृ० १५ - १७ व सप्टेंबर २००८, पृ० १६-१८ व २८.

**चौ**कर, शुभदा/मराठी अस्मितेचे गमभन/ लोकसत्ता/लोकरंग पुरवणी/२४ फेब्रुवारी/पृ० १

**टि**ळक, विद्यागौरी/भाषा आणि क्रांती/ /चिंतन आदेश दिवाळी अंक/ वर्ष ९/ पृ० १५३-५५.

**ढा**ले, राजा/इये मराठीचिये नगरी सकाळ/सप्तरंग पुरवणी/२५ मे/पृ० ३

**त**लगेरी, प्रमोद/ कोशावांचून भाषा पोरक्या/सकाळ/२ जुलै/पृ० ६

**ता**वरे, स्नेहल/मराठी भाषेचे शुद्धलेखन आणि उच्चारण/अक्षर वैदर्भी/मे/वर्ष २४ अंक २/ पृ० ४५ ते ४९.

**दा**तार, शांताराम/हुतात्म्यांना गाऱ्हाणे कशासाठी? मराठी राज्यव्यवहार/महाराष्ट्र टाइम्स/२७ फेब्रुवारी/पृ० ४

**दा**देगावकर, उमा/भाषाशिक्षण आणि भाषाभिरुची/समस्या आणि उपाय-एक निरीक्षण/मराठी साहित्य परिषद आंध्र प्रदेश संचालित/मराठी महाविद्यालय सुवर्ण महोत्सव/स्मरणिका/'म' मराठीचा/ मार्च/

**दे**व, सदाशिव/भारतीय भाषांची विविधता आणि महाजाल/साहित्यसूची/एप्रिल/वर्ष २९ अंक ३/पृ० ५४-५६

**ना**बर, अरुण/मराठीच्या सार्वभौमत्वासाठी/ लोकप्रभा/मार्च/पृ० १६-१८

**ने**वाळकर, अमला/माहिती तंत्रज्ञान आणि मराठी/ विवेक/फेब्रुवारी/पृ० ४२-४४

**प**रब, प्रकाश/भाषा, समाज आणि शासन/महाराष्ट्र टाइम्स/११ सप्टेंबर/ पृ० ४

**प**रब, प्रकाश/मराठी शाळा यासाठी वाचवायच्या.../महाराष्ट्र टाइम्स/१७ एप्रिल/पृ० ६

**प**रब, प्रकाश/महाराष्ट्राचे भाषाधोरणच मराठी विरोधी/महाराष्ट्र टाइम्स/२७ फेब्रुवारी/पृ० ४

**प**रुळेकर, राजू/मराठी बोला मराठी लिहा/ लोकप्रभा/७ मार्च/पृ० १९-२०

**पा**टील,. इरगोंडा/मराठीला 'ज्ञानभाषा' बनविणे आपल्या हाती/सकाळ १ ऑगस्ट/पृ० ७

**ब**डवे नीती/भाषा आणि भाषा कौशल्य/ मराठी साहित्य परिषद आंध्र प्रदेश/मराठी महाविद्यालय सुवर्ण महोत्सव/स्मरणिका - म मराठीचा/मार्च / पृ० ६८-७०

**बा**गवे, अशोक/शब्दांचा 'प्लेजर बॉक्स' अबकड/महाराष्ट्र टाइम्स/विशेषांक मराठीज आर रॉकिंग/१८ जून/पृ० १०

**म**नसबदार, मीना/शुद्धलेखन शालेय मराठीच्या संदर्भात/मराठी साहित्य परिषद आंध्र प्रदेश/मराठी महाविद्यालय सुवर्ण महोत्सव स्मरणिका/मार्च/पृ० ७५-७६

**बो**रगावकर, मनोहर/मराठी भाषा, अजूनही आशा/उत्तमकथा दिवाळी अंक/वर्ष ४१ अंक ४८५-८६/पृ० ८३-८५

**म**राठे, गं० भा०/मराठीची लक्तरे/अमृत/ वर्ष ५६ अंक ११/डिसेंबर/पृ० ९४-९६

**म**राठे, वि०का०/'मराठी'चा 'आटीव' इतिहास/ लोकप्रभा/७ मार्च/पृ० ९ते१३

**मा**लकर, यमाजी/मराठीचे (चपखल) प्रमाणीकरण/सकाळ/१ जानेवारी/ 'उकल'मध्ये/पृ० ७

**रा**ईरकर, दीपक/दुरवस्था मराठी मानसिकते-मुळेच/सकाळ/३० सप्टेंबर/पृ० ६

**रा**ऊत, भरतकुमार/महाराष्ट्र टाइम्स/बळी तो कान पिळी/दृष्टिकोण/रविवार १६ मार्च/ संवाद/पृ०२

**रा**ऊत, भरतकुमार/महाराष्ट्र धर्म वाढवावा/ महाराष्ट्र टाइम्स/२७ फेब्रुवारी/ पृ० ५

**शि**वलकर, शिल्पा/मराठीची दुरवस्था रोख-ण्यासाठी काय करता येईल? साप्ता. सकाळ/ १ मार्च/पृ० १२ व ६१; ६१ ते ६४

**सं**गोराम, मुकुंद/शब्दांसाठी... शब्दांच्या पलीकडे/लोकसत्ता/२७ फेब्रुवारी/पृ० ६

'महाराष्ट्र टाइम्स'च्या महानगरी भाषा / 'मराठीज् आर रॉकिंग' विशेषांक गुरुवार १९ जून/भाग २ पृ० २ मध्ये 'मराठीची लक्षणीय रूपं' खालील लेखकांनी दाखविली आहेत :

(१) कोलासो, जॉन - बोली भाषांनी नटलेली हिरवी वसई.
(२) जोशी, प्रतिमा - बायामाणसांची भाषा
(३) पवार, जयंत - कष्टकऱ्यांनी बनवली बम्बय्या मराठी
(४) भानजी, चारुल - कोलीवाड्याची बोली
(५) व्हयमाने, संजय - पोलिस लायनीतले 'बोलके पोपट'.

**विशेष लेख:** ग्लोबल मराठी दिन/२७ फेब्रुवारी २००८ महाराष्ट्र टाइम्स/पृ० ७/स्वमते/ (१) आमडेकर, माधवी/युरोपात मराठी झेंडा. (२) चव्हाण, सुरेंद्र/मनात आहे मायबोलीची ओढ. (३) वाघ, रवी/गल्फमध्ये मराठी संवर्धनाची चळवळ. (४) वाणी, जगन्नाथ/मराठीच्या संवर्धनाचा कटाक्षाने प्रयत्न. (५) हर्डीकर, विद्या/मराठी भाषेच्या शोधात

**अग्रलेख :** सकाळ/२३ फेब्रुवारी/मराठी सिद्धान्त नि व्यवहार/पृ० ६/महाराष्ट्र टाइम्स/ २ जुलै/उर्दू शाळात मराठी/पृ० ६/सकाळ/'पर्याया'तून मराठी मुक्त/पृ० ६

## लेखक-परिचय

- रेणुका **ओझरकर :** मुंबई विद्यापीठाच्या बी०ए० (संस्कृत) परीक्षेत सर्वप्रथम. भाषाविज्ञान विषयात एम०ए० 'मराठी क्रियापदे' या विषयावर पीएच०डी०साठी संशोधन. 'भाषा आणि जीवन' मध्ये एक लेख प्रसिद्ध.
- विरुपाक्ष **कुलकर्णी :** इन्स्ट्रुमेंटेशन अभियंता, भाषांतर कामासाठी केंद्रशासनाच्या सेवेतून दहा वर्षे आधी स्वेच्छा निवृत्ती. स्वातंत्र्यवीर सावरकरलिखित 'माझी जन्मठेप', रावसाहेब कसबेकृत 'आंबेडकरवाद : तत्त्व आणि व्यवहार', ज्योत्स्ना देवधरलिखित 'कल्याणी', ग०प्र० प्रधानांचे 'टॉलस्टॉयला पत्र' इत्यादी सुमारे १८ पुस्तकांचे कन्नडमध्ये भाषांतर, संत तुकारामांच्या संकेतस्थळावरील मराठी मजकुराचे कन्नड भाषांतर. 'चिंटू' या चित्रपट्टीचे २००४पासून रोज भाषांतर. उमा कुलकर्णींच्या कन्नड - मराठी भाषांतर कार्यात महत्त्वाचा सहभाग.
- डॉ० नीलिमा **गुंडी :** स०प० महाविद्यालय (पुणे) येथे मराठीचे अध्यापन, 'आभाळाचा फळा' व 'कानामात्रा' या दोन बालकवितासंग्रहांना महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार. 'प्रकाशाचे अंग' या काव्यसंग्रहाला इचलकरंजीच्या आपटे वाचनमंदिराचा पुरस्कार. 'कविता विसाव्या शतकाची'च्या सहसंपादक.
- डॉ० ब्रह्मानंद **देशपांडे :** महामहोपाध्याय, विद्याभूषण, प्राचीन मराठी वाङ्मयाचे व्यासंगी संशोधक. 'देवगिरीचे यादव', 'शोधमुद्रा' इ० पुस्तके प्रकाशित.
- डॉ० रमेश **धोंगडे :** एम०ए०(इंग्लिश), एम०ए०(भाषाविज्ञान), 'मूड्स अँड आस्पेक्ट्स इन इंग्लिश अँड मराठी' या विषयावर पीएच०डी० प्रबंध. भाषाविज्ञानाचे निवृत्त प्रपाठक (डेक्कन महाविद्यालय). ऑक्सफर्ड इंग्लिश-मराठी शब्दकोश, अर्वाचीन मराठी, 'भाषा आणि भाषाविज्ञान' 'मराठी भाषा आणि शैली', 'सामाजिक भाषाविज्ञान', 'शैलीवैज्ञानिक समीक्षा', 'आत्मलक्ष्यी समीक्षा', 'तेंडुलकरांची नाटके', 'शतकाची विचारशैली', 'लर्न मराठी' इत्यादी पुस्तके. महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार, महाराष्ट्र शासनाचे तीन पुरस्कार, बालभारतीच्या इंग्लिश पाठ्यपुस्तक समितीचे अध्यक्ष.
- प्रमोद **पडवळ :** एम०ए०,एम०फिल०,पीएच०डी० ; महाराष्ट्रात व हिमाचल प्रदेशात पाच वर्षे आणि त्यानंतर (२००४ पासून) काशी हिंदू विश्वविद्यालयात मराठीचे अध्यापन. काही काळ पत्रकार. हिंदीतून मराठी व मराठीतून हिंदीत अनुवाद.
- प्र०ना० **परांजपे :** एम०ए०,पी०जी०डी०टी०इ०,एम०लिट० रामनारायण रुइया महाविद्यालय, मुंबई येथे इंग्रजीचे १५ वर्षे आणि पुणे विद्यापीठात वृत्तपत्र-विद्येचे २० वर्षे अध्यापन. एक कथासंग्रह, तीन भाषांतरे, पाच संपादने, पाच सहसंपादने व एक सहलेखन अशी १५ पुस्तके प्रकाशित. याव्यतिरिक्त दहा पुस्तकांत लेख समाविष्ट. संगीत नाटक स्पर्धेत लेखनाबद्दल महाराष्ट्र शासनाचे प्रथम पारितोषिक..
- रमेशचंद्र **पाटकर :** विल्सन महाविद्यालय, मुंबई येथून मराठी-विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. 'आत्मचरित्र : एक साहित्य प्रकार' या विषयावर पीएच०डी०. 'कलेचा इतिहास : भारतीय पाश्चात्य', हे पुस्तक महाराष्ट्र राज्य कला संचालनालयाने प्रकाशित केले. माधव सातवळेकरांच्या चित्रसंग्रहात सातवळेकरांची दीर्घ मुलाखत समाविष्ट. प्रा० बाबुराव सडवलेकरांच्या लेखसंग्रहाचे ('महाराष्ट्रातील कलावंत : आदरणीय व संस्मरणीय') संपादन. 'शहीद भगतसिंग : आठवणी, विवेचन आणि विचार', 'मराठी नियतकालिकांतील दृश्य विचार' ही अन्य पुस्तके. कथा, कविता, साहित्यसमीक्षा यांचे लेखन.



अनुक्रमणिका

- यशोधरा **पवार :** एम०ए० (मराठी), एम०ए०(हिंदी),बी०लिब०; गोवा व महाराष्ट्रात काही वर्षे महाविद्यालयीन अध्यापन. १९८५पासून श्रीमती ना०दा० ठाकरसी विद्यापीठाच्या शाखा-ग्रंथालयात साहाय्यक. आता निवृत्त.
- डॉ० सौ० शुभांगी अविनाश **पातुरकर :** 'मराठी मुक्तछंद' या विषयावर पीएच०डी० त्याच शीर्षकाचे पुस्तक १९९९मध्ये प्रकाशित. त्याला ग्रंथोत्तेजक सभा (पुणे), विदर्भ साहित्य संघ (नागपूर) यांचा म०म०वा०वि० मिराशी पुरस्कार व विदर्भ संशोधन मंडळ (नागपूर) यांचा डॉ० बाळाजी पुरस्कार असे पुरस्कार. 'मंतरलेले दिवस' (२००३) हा ललितलेखांचा संग्रह प्रकाशित.
- रंजना **फडके :** वाडिया महाविद्यालयात अध्यापन. कवयित्री. अनेक संस्थांमध्ये सहभाग.
- विवेक **भट :** रासायनिक अभियंता. वयाच्या पन्नाशीनंतर एम०ए० (संस्कृत) व त्यानंतर एम०ए० (भाषाविज्ञान). सध्या आय०आय०टी० (मुंबई) येथे भाषाविज्ञानात पीएच०डी०साठी संशोधन. मुंबई विद्यापीठाच्या जर्मन विभागात भाषाविज्ञान व इंग्लिश कम्युनिकेशन या विषयांचे. तसेच डहाणूकर महाविद्यालयात संस्कृत विषयाचे अभ्यागत प्राध्यापक. भारतात व परदेशात अनेक शोधनिबंधांचे सादरीकरण.
- सीमा **भानू :** बी०ए०,बी०सी०जे०,एलएल०बी० दैनिक लोकमत(पुणे) येथे उपसंपादक. विविध नियतकालिकांत लेखन. 'प्रकाशवाटा' ह्या प्रकाश आमटे यांच्या आत्मवृत्ताचे शब्दांकन प्रकाशनाच्या मार्गावर.
- रत्नाकर बापूराव **मंचरकर :** एम०ए०,पीएच०डी०;मध्ययुगीन मराठी वाङ्मय, नवे साहित्य प्रवाह, संशोधन, समीक्षा, कथनमीमांसा, वाङ्मयेतिहास, साहित्यिक भूगोल, भाषाविज्ञान, वाङ्मयाचे अध्यापन, राजकीय तत्त्वप्रणाली, शिक्षण आणि समाज, तौलनिक साहित्य या अभ्यासक्षेत्रांत ९ ग्रंथ, ४ सूत्रसंपादने, ८ संपादने आणि तीनशे शोधनिबंध; दोन राज्यपुरस्कार, तीन जीवनगौरव पुरस्कार आणि प्रतिष्ठित संस्थांचे ७० पुरस्कार.
- वर्षा **सहस्रबुद्धे :** एम०ए० (जर्मन), एम०एड०; प्राथमिक शिक्षण सल्लागार. पुण्यातील अक्षरनंदन शाळेच्या माजी मुख्याध्यापक व संस्थापक-सदस्य; राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय संस्थांतर्फे शैक्षणिक कामांची पाहणी व वृत्तांत-लेखन; नागरी, ग्रामीण व दुर्गम आदिवासी भागातील शालेय व शाळेबाहेरील मुलांना वाचनलेखनाची गोडी लावणाऱ्या पद्धतींचा शोध, विकास व अध्यापन. कृष्णकुमारलिखित 'मुलांची भाषा व शिक्षक' या पुस्तकाचा मराठी अनुवाद.

## आवाहन

(१) **परिषदेचे संकेतस्थळ** : दि. १ मे २००८ रोजी परिषदेचे संकेतस्थळ सुरू झाले आहे. त्याचा पत्ता **www.marathiabhyasparishad.com** या संकेतस्थळावर परिषदेची घटना, पदाधिकारी, कार्यक्रमांची छायाचित्रे, 'भाषा आणि जीवन'चे अंक, सभासदवर्गणी इत्यादी माहिती उपलब्ध आहे. सभासदांनी या संकेतस्थळावरील मजकुराचे परिशीलन करावे, आपला अभिप्राय कळवावा आणि सूचनाही कराव्यात.

(२) 'मराठी अभ्यास परिषदे'च्या आजीव सदस्यांनी तसेच वर्गणीदारांनी आपला **e mail** चा पत्ता कृपया कळवावा. त्यामुळे आपल्याशी संपर्क साधणे सुलभ होईल.



अनुक्रमणिका

